# कळ्यांचे निःश्वास

समज

लेखिका :—विभावरी शिरूरकर, बी. ए.

प्रकाशकः—हरी विष्णु मोटे, प्रतिभा कचेरी, मुंबई, ४.

[ आवृत्ति दुसरी ]

किंमत १ रु. ।

[ऑक्टोबर १९३४

# प्रकाशनपूर्व अवलोक

१. " कळयांचे निःश्वास " या ग्रंथाच्या लेखिका श्री. विभावरी शिरूरकर या सारस्वत ज्ञातीच्या पदवीधर तरुणी आहेत, असें प्रकाशकांकडून समजतें. परंतु लेखिकेशीं माझा परिचय बिलकूल नाहीं. ग्रंथ वाचून मत बनविलें आणि प्रस्तावना लिहिण्याचें कबूल केलें, तेव्हां लेखिकेचें नांवही ठाऊक नव्हतें, व अजून तिला मुळींच पाहिलें नाहीं. म्हणजे प्रत्यक्ष परिचय मुळींच नाहीं. अशा परिस्थितींत प्रस्तावना लिहिली जात आहे. या प्रकारच्या परिस्थितींत प्रस्तावना लिहिण्याचे प्रसंग किंवा संधि थोड्यांनाच आली असेल, आणि यासाठीं प्रत्यक्ष परिचय होण्याच्या पूर्वींच केवळ गोष्टी वाचून जें काय वाटलें, तें लिहावयाची संधि साधून घेत आहें.

२. गोष्टी वाचून समाधान वाटलें. तें समाधान होण्याचें कारण स्त्रियांनीं मन मोकळें करून, पण स्वजातीविषयीं अत्यंत सहृदयतेनें लिहिलेल्या गोष्टी फारशा वाचनांत नाहींत. " हृदय शारदे "तील कांहीं कथा वगळल्यास मराठींत तरी हाच पहिला संच आहे. लेखिकेनें आपल्या भगिनीवर्गांतील अनेक व्यक्तींच्या आयुष्यांतील प्रसंग मोठ्या सहृदयतेनें वर्णिले आहेत, हें त्यांत विशेष आहे.

३. कै. हरि नारायण आपट्यांच्या काळांत, वाचकवर्ग पुरुष आणि स्त्रियांच्या आयुष्यक्रमासंबंधानें आणि विचारांसंबंधानें उत्सुक, जिज्ञासू. अशा परिस्थितींत लहान मुलींचा आयुष्यक्रम सहृदयतेनें आणि मुलींच्याच भाषेंत लिहिणाऱ्या कादंबरीकाराची चहा झाली. त्या कालच्या स्त्रियांच्या आयुष्यक्रमाच्या कांहीं भागांचें चित्र फारच आकर्षक झालें, आणि स्त्रियांच्या भाषेंत कथालेखनाची खुमारी महाराष्ट्रीय वाचकांच्या परिचयाची झाली आणि अनेक व्यक्तींनीं

स्त्रिय च्या भाषेंत स्त्रीवृत्तकथन आणि स्त्रीविचारव्यक्तीस सुरुवात केली. राजकारणाच्या क्षेत्रांत देखील स्त्रियांची दृष्टि दाखविण्याचा प्रयत्न झाला. तशा अनेक प्रयत्नांपैकीं "वत्सलावहिनीचीं पत्रें" अत्यंत लोकप्रिय झालीं. आणि जर तीं पत्रें मराठी वाङ्मयांत आपलें स्थान कायमचें देऊन बसलीं, तर बायकी भाषेमुळें विशिष्ट कालच्या राजकारणाचें स्मारक कायम राहिलें, असें म्हणावें लागेल.

४. पुरुषांनीं स्त्रियांची भूमिका घेऊन लिहिणें हें कांहीं प्रसंगीं वाचकवर्ग चकवण्यासाठीं, तर कांहीं अंशीं नवीन दृष्टि उत्पन्न करण्यासाठीं होत असतें. पुरुषांपेक्षां स्त्रियांची दृष्टि पुष्कळदां अत्यंत भिन्न असते, आणि आपल्याकडे स्त्रीवर्ग फारसा पुढें आला नसल्यामुळें त्यांच्या विचारांची आणि त्यांच्या तर्फेची मांडणी करण्याचें काम पुरुषांवरच पडत असे; आणि या कारणामुळें स्त्रियांचें नांव घेऊन कधीं कधीं पुरुषांना लेख लिहावे लागत. अशा प्रकारचें अनेक लेख स्त्रियांचे कैवारी आणि सुधारणावादी म्हणविणाऱ्या पत्रांनीं प्रसिद्ध केले आहेत.

५. स्त्रियांची भूमिका घेऊन पुरुषांनीं लेख लिहिणें ही गोष्ट केवळ स्त्रीवर्गाच्या हितासाठीं निःस्वार्थ हेतूनें पुरुषांकडून होत होती, असें नाहीं. अनेक प्रसंगीं तें निराळ्याच कारणामुळें होत असे. संपादकवर्ग स्त्रियांचे लेख दाक्षिण्यामुळें आणि उत्तेजन देण्याच्या भावनेनें छापी, आणि हें जेव्हां लेखकवर्गाच्या नजरेस येई तेव्हां लेखक देखील स्त्रीनामाचा आश्रय करीत. कधीं याहूनही निराळें कारण असे. आपल्या कुटुंबांत सुशिक्षित स्त्रियांचें अस्तित्व असणें ही गोष्ट आपल्या कुटुंबाला गौरवाची आहे, असें ज्या मंडळीस वाटत असे, तीं मंडळी घरांतीलच स्त्रीसदस्यांच्या नांवानें कविता व लेख पाठवीत असत. 'सुधारक' पत्राच्या मध्यकाळांत, म्हणजे विनायकराव जोशी यांच्या कारकीर्दीत, ''सुधारक' पत्र असल्या प्रकारच्या स्त्रियांच्या

लेखांनीं भरलेलें असे. नवरा कवि आहे आणि त्याच्या बायकोचें शिक्षण फारसें झालें नसलें, तरी त्याच्या बायकोचीं संस्कृत-शब्द-प्रचुर काव्यें वाचावयास मिळत असत; एवढेंच नव्हे, तर अनेक, जवळ जवळ अशिक्षित, स्त्रियांच्या नांवावर संस्कृत कविता देखील छापलेली दृष्टीस पडे. या काळास स्त्रियांस उत्तेजन देण्याचा काळ असें म्हटलें पाहिजे.

६. स्त्रीलेखिका म्हणून ज्या काळांत कौतुक वाटून केवळ त्यांस उत्तेजनार्थ चांगले अभिप्राय द्यावयाचे तो काळ आतां संपत आला आहे, असें मी गृहीत धरतों; आणि प्रस्तुत प्रसंगीं जें मी लिहीत आहें, तें अभिनव लेखिकेस उत्तेजनासाठीं नसून लेखनाच्या क्षेत्रांत प्रविष्ट झालेल्या व्यक्तीचें यथागुण स्वागत व्हावें, याच भावनेनें लिहीत आहें. मला केवळ दाक्षिण्याच्या भावनेनें लिहिणें रुचिकर वाटत नाहीं. स्त्रियांना जर पुरुषांच्या बरोबरीनें वागवायचें असेल, तर दाक्षिण्याचे उमाळे देखील दूर केले पाहिजेत आणि व्यवहारांत पुरुषांकडे जितक्या परीक्षक दृष्टीनें पहावयाचें तितकीच परीक्षकदृष्टी स्त्रियांच्या—आणि विशेषतः सुशिक्षित स्त्रियांच्या—बाबतींत वापरली पाहिजे. इतर व्यवहारांतील सम दृष्टि अर्थात् वाङ्मयक्षेत्रांत देखलि वापरली गेली पाहिजे. आज जे स्त्रियांचे ग्रंथ प्रसिद्ध होतात, त्यांत उत्तेजनाची भावना असणें शक्य नाहीं. असें वाटतें. केवळ उत्तेजनासाठीं स्त्रियांचे ग्रंथ प्रसिद्ध करून आपल्या पदरास खार लावून घेणारे प्रकाशक फारसे असतील, असें वाटत नाहीं. वाचकांकडून मागणी नसली तर प्रकाशक प्रसिद्ध देखलि करणार नाहींत, आणि वाचकवर्ग केवळ स्त्रियांचे लेख म्हणून वाचणार नाहीं. सामान्य वाचक हा फारच कठोर परीक्षक असतो. तो अनीति सहन करील, शिव्या सहन करलि, पण लेखकाची नीरसता कधींच सहन करणार नाहीं.

७. प्रस्तुत काळीं वाचकवर्ग स्त्रियांचे लेख मुद्दाम वाचतो, आणि त्यामुळें प्रकाशकांना प्रकाशनासाठीं क्षेत्र उत्पन्न होतें. वाचक स्त्रियांचे लेख वाचण्यासाठीं उत्सुक असतो, याचें कारण त्याची स्त्रियांच्या मनाविषयीं जिज्ञासा असते, हें होय. अनेक विषयांवर भाऊ बहिणीशीं चर्चा करणार नाहीं, किंवा बहीण भावाशीं चर्चा करणार नाहीं. पुष्कळदां नवरा–बायको देखील अनेक विषयांची चर्चा मोकळेपणानें करणार नाहींत. त्यामुळें स्त्रियांचे विचार काय आहेत. हें पुरुषांस पुरें समजत नाहीं, व पुरुषांचे विचार स्त्रियांस समजत नाहींत. स्त्रियांसाठीं म्हणून जीं मासिकें काढलीं जातात, त्यांच्य वाचकांमध्यें पुरुषवर्गच फार असतो, आणि त्यांतल्या त्यांत अविवाहित पुरुषांचा वर्ग अधिक असतो. या दृष्टीनें आपणांस असें म्हटलें पाहिजे कीं, आजच्या समाजांत “ भिन्न-लिंग-मनोजिज्ञासा ” ही गेल्या पिढीपेक्षां अधिक आहे. प्रेममूलक विवाहांचें प्राचुर्य जरी आजच्या समाजांत नसलें तरी त्याची शक्यता आहे; आणि त्यामुळें भिन्न-लिंग-मनोजिज्ञासा आजच्या तरुणांस व तरुणींस आवश्यक झाली आहे. स्त्रियांचें मन समजण्याची आवश्यकता तरुणांस आहे, एवढेंच नव्हे, तर आईबापांसही आहे. समाजांत मुलींचा कौमार्यकाल वाढला; पण त्याबरोबर त्या स्थितीला अनुरूप असें खबरदारीचें शिक्षण आईबापांस मिळालें नाहीं आणि समाजांतील सुशिक्षित वर्गानें देखील या प्रश्नासंबंधानें फारसा विचार केला नाहीं. तो त्यांनीं करावा म्हणूनच ‘ मुलींचा वाढता कौमार्यकाल आणि त्याची निगा ’ या विषयावर एक लेख मीं मुद्दाम ‘ विद्यासेवकांत ’ पूर्वी प्रसिद्ध केला आहे.

८. स्त्री व पुरुष यांच्यामध्यें जो जातितः भेद आहे, त्यामुळें पुरुषांना स्त्रियांचें मन केवळ आपल्या मनावरून तर्क काढीत गेल्यानें समजणार नाहीं. स्त्रियांचें मन समजावून देण्यास स्त्रियाच पाहिजेत. पुरुष ज्यूरींत असला, तर त्यास फसविणें फार सोपें जातें; पण स्त्रिया

ज्युरींत असल्या, तर ती गोष्ट स्त्री-अपराध्यांना फार जाचक होते, अशा तऱ्हेची स्त्रियांसंबंधीं ग्वाही अमेरिकेंतील अनेक वर्तमानपत्रांच्या रिपोर्टरांनीं प्रसिद्ध केली आहे. दाक्षिण्याच्या भावनांमुळें—स्त्रियांच्या अश्रु गाळण्यामुळें-अनेक लोक फसतात, आणि स्त्रियांस अनुकूल असा निकाल पुरुष देतात, असें मत अनेक न्यायाधिशांनीं व्यक्त केलें आहे. पुरुष स्वाभाविकपणें फसतात, ही गोष्ट तर खरीच आहे, पण आपल्याकडे कांहीं वर्षांपूर्वी एका वर्गाची वृत्ति अशी झाली होती कीं, तो वर्ग स्त्रियांविषयीं मुद्दाम खोट्या कल्पना करून घेई, आणि प्रसृत करी. सुशिक्षित स्त्री म्हणजे सुधारक म्हणविणाऱ्या वर्गाची मान्यदेवता होती. ह्या देवतेकडूच जर कांहीं गैर कृत्य झालें, तर तें नाकारण्याची किंवा त्यावर पांघरूण घालण्याची, किंवा त्याचें गोड व संभावित स्पष्टीकरण करण्याची पद्धत होती. स्त्रीशिक्षणास उत्तेजन देण्यासाठीं हे सर्व प्रयत्न होत होते. कोणी सुशिक्षित स्त्रियांचे दोष काढले म्हणजे ते दोष नाकारण्याची त्यांची प्रवृत्ति होत होती. सुशिक्षित स्त्रियांचें वर्तन इतर स्त्रियांच्या वर्तनापेक्षां कांहीं अंशीं बरें असणार यांत शंका नाहीं; तथापि त्यांस केवळ निष्पाप असें समजण्यांत मानवी मनोधर्माचें अज्ञान लोक दाखवीत, असें म्हणावें लागतें.

९. स्त्रियांनीं कवि किंवा ग्रंथकार होणें ही गोष्ट महाराष्ट्राला नवीन नाहीं. याविषयीं सविस्तर विवेचन मागें मीं "महाराष्ट्र आणि काव्यविकास" या 'यशवंत' मासिकांत प्रसिद्ध केलेल्या लेखांत केलें आहे. हालाच्या 'प्राकृत सप्तशतींत' ज्या शृंगारिक गाथा समाविष्ट झाल्या आहेत, त्यांमध्यें अनेक कवयित्रींचीं नांवें आहेत. संस्कृत कवयित्रींमध्यें लाटी, प्रभुदेवी, मयूरी वगैरे कवयित्री प्रसिद्ध होऊन गेल्या. त्यांची माहिती त्या लेखांत आलीच आहे. भक्तिप्रधान काव्यांचा काल महाराष्ट्रांत आला, तेव्हां मुक्ताबाई, जनाबाई, गोणाई वगैरे कवयित्री

होऊन गेल्या. त्याच काळांतील गुर्जर वाङ्मयांतील प्रसिद्ध स्त्री म्हणजे मिराबाई होय. ज्या वर्गांत पुरुष लेखक किंवा कवि म्हणून पुढें येत, त्याच वर्गांतून स्त्रियाही पुढें येत. तमाशांतील लावण्या करणाऱ्या स्त्रियांची माहिती मला नाहीं; पण त्या वर्गांत कवयित्री असणें अशक्य नाहीं. आतां सुशिक्षित मध्यम वर्ग जो तयार झाला आहे, त्या वर्गांत अनेक स्त्रिया देखील आहेत. श्रीमती काशीबाई कानिटकर, सौ. इंदिराबाई सहस्रबुद्धे, सौ. कमलाबाई बम्बेवाले वगैरे स्त्रिया कादंबरी—लेखक म्हणून पुढें आल्या आहेत, तर कांहीं कवयित्री म्हणून पुढें आल्या आहेत. लघुकथालेखनाचें क्षेत्र देखील स्त्रियांनीं सोडलें नाहीं. 'कृष्णाबाई,' कु. पिरोज आनंदकर, सौ. कमलाबाई टिळक, कु. कुमुदिनी प्रभावळकर वगैरे अनेक स्त्रियांचा चांगल्या लघुकथालेखिका म्हणून उल्लेख करतां येईल. या अनेक स्त्रियांचे लेख वाचतां तरुण स्त्रियांनीं प्रचलित महाराष्ट्रीय वाङ्मयांत बरेंच वैचित्र्य उत्पन्न करून दिलें आहे, असें आढळून येतें.

१०. प्रस्तुत संग्रहांत आलेली लेखिकेची प्रत्येक गोष्ट स्त्रीस्वभाव-परिचयाच्या दृष्टीनें महत्वाची आहे आणि प्रत्येक गोष्टींत लेखिकेनें नायिकेकडून गोष्ट वदविल्यामुळें नायिकेचे विचार लेखिकेस दाखवावे लागले; आणि त्यामुळें सहृदयत्व कर्तव्य होऊन बसलें, व हें कर्तव्य लेखिकेनें चांगल्या तऱ्हेनें पार पाडलें आहे. प्रत्येक भिन्न व्यक्तीच्या मनांत शिरून त्या त्या व्यक्तिचें मनोवर्णन करणें याला अनुभवबाहुल्य आणि थोर सुशिक्षितता लागते. विविध प्रकारच्या म्हणजे विविध परि-स्थितींतल्या स्त्रियांची प्रसंगानुसार भावना सांगतांना लेखिका समाजाची थोर सेवा करीत आहे. आपणांस भोंवतालचें जग समजून घ्यावयाचें आहे. लेखिकेनें केलेल्या प्रयत्नासारखे प्रयत्न तें इष्ट साध्य करण्यांत फार उपयोगी आहेत.

११. पुरुषांच्या स्त्रियांसंबंधानें स्वाभाविक अपेक्षा, त्यांच्या मनांत

विविध प्रसंगीं होणारी चलबिचल, यांसारख्या गोष्टी स्त्रियांनीं समजावयास पाहिजेत. त्याप्रमाणें स्त्रियांचीं मानसिक स्थित्यंतरें पुरुषांस समजावयास पाहिजे आहेत. आईबापांना मुलींची मनोवृत्ति समजली पाहिजे, व मुलींना आईबापांची मनोवृत्ति समजली पाहिजे. वडील मंडळीच्या आज्ञेंत 'ब्र' काढल्याशिवाय अपत्यांनीं रहाणें, किंवा नवऱ्याच्या आज्ञेंत स्वतः विचार केल्याशिवाय बायकोनें रहाणें या गोष्टी आज समाजांत शक्य नाहींत, व इष्टही नाहींत. प्रत्येक मनुष्याच्या मनांत स्वार्थबुद्धि असते; आणि ती मनुष्यमात्राच्या इतर व्यक्तींशीं उत्पन्न झालेल्या संबंधावर परिणाम करूं लागते. त्यामुळें प्रत्येकास दुसऱ्या व्यक्तीच्या स्वार्थबुद्धीस जपावें लागतें; आणि, मानवी कौशल्य दोघांची स्वार्थबुद्धि एकमेकांस हितकर करण्यांतच असतें. आदर, भीति, नातें किंवा आश्रय या कारणांमुळें आपल्या हुकमतींत आलेल्या व्यक्तीचें हितानहित न पहातां आपलें हिताहित पहाण्याची प्रवृत्ति जगांत नेहमीं कार्य करीत असल्यामुळें 'पित्राज्ञापालन,' 'मातृदेवोभव' यांसारखे जुने प्रसंगनिरपेक्ष उपदेश टिकावयाचे नाहींत. "त्याग" ह्या पहिल्या कुटुंबचित्रांत, तसेंच, "बाबांचा संसार माझा कसा होणार?" ह्या गोष्टींत लेखिकेनें दारिद्र्यामुळें आणि कुटुंबविस्तारामुळें मुलीच्या पैशावर जास्त अवलंबून रहावें लागलें आहे, असा बाप मुलीच्या लग्नाच्या आड कसा येतो, हें दाखविलें आहे.

"अंतःकरणाचे रत्नदीप" ही गोष्ट स्त्रियांच्या वैवाहिक प्रश्नाची दुसरी एक महत्वाची बाजू जोरानें पुढें मांडीत आहे. रूप नसल्यामुळें लग्न राहिलें, तरी जातीच्या बाहेर लग्न करणें गैर आहे काय? हा प्रश्न ती पुढें मांडीत आहे. ही देखील "अर्थोऽहि कन्या परकीय" या प्रश्नाचीच दुसरी बाजू मांडीत आहे. आईबापांना असें वाटतें कीं मुलीला शिक्षण देऊन काय करावयाचें? दुसऱ्याच्याच

घरीं ती जाणार नाहीं काय ? आणि ती जर दुसऱ्याच्या घरीं जाणार असली, तर तिच्यावर इतका खर्च कशाला ? मुलगी परघरीं जाणार म्हणून आईबाप खर्च करावयास भितात, तर परजातींत जाणार, तर झालेला खर्च अगदींच वाया नाहीं कां गेला ? या तऱ्हेची दृष्टि समाजांत उत्पन्न होऊन जातीबाहेर लग्न केल्याबद्दल कसा गहजब होतो, तो ‘ रत्नदीप ’ कथेंत यमूनें आपल्या निःश्वासयुक्त शब्दांनीं वर्णिला आहे. ‘ अविनाश ’ या कथेंत द्रव्याला महत्त्व देऊन, जें लग्न मुलीवर लादलें गेलें, त्या लग्नामुळें मुलीच्या सुखाचें कसें मातेरें झालें हें दाखविलें आहे. अर्थात् पहिल्या दोन गोष्टींप्रमाणें ही तिसरी गोष्ट देखील कौटुंबिक अर्थ-शास्त्राचा तीव्र निषेध आहे. “ तूं आई कीं दावेदारीण ? ” या दृश्यांत बऱ्याच लोकांस अपरिचित असलेलें दृश्य लेखिकेनें दाखविलें आहे. या कथा जरी उद्‌बोधक असल्या, तरी लेखिकेचें खरें कौशल्य ज्या इतर कथांत आहे, त्या कथा म्हटल्या म्हणजे [ १ ] प्रेम हें विष कीं अमृत, [ २ ] रिकाम्या भांडयाचे निनाद, [ ३ ] प्रेम कीं पशुवृत्ति ? [ ४ ] प्रेमाची पारख—या चार कथा होत. या चार कथांत लेखिकेनें वाचकांच्या ताटांत प्रेमाचें शास्त्र सढळ हातानें ओतलें आहे.

१२. “ प्रेम हें विष कीं अमृत ” ही गोष्ट एक अगदीं स्वाभाविक दृश्य दाखवीत आहे. भावासारखें भाऊ नसलेल्या व्यक्तीवर प्रेम किती विश्वसनीय आहे, याची साक्ष ही कथा देत आहे. स्त्रिया आणि पुरुष यांची मैत्री निर्विषयी राहूं शकेल काय, याविषयीं चर्चा प्लेटोच्या काळापासून चालली आहे. प्लेटॉनिक प्रेम म्हणजे स्त्री व पुरुष यांमधील विषयविकाररहित प्रेमाची शक्यता जरी प्लेटोनें सांगितली, तरी शास्त्रज्ञांची तें नाकारण्याचीच प्रवृत्ति अधिक आहे. आमचें प्रेम विषयी नाहीं, असें दाखविण्यासाठीं किंवा आग्रहपूर्वक सांगण्यासाठीं मात्र प्रेमाच्या प्रवाहांत सांपडलेली, परंतु आपल्या

अंतःकरणाची पूर्ण जाणीव न झालेलीं स्त्री–पुरुषें प्लेटॉनिक प्रेमाचें व अस्तित्वाचें समर्थन आग्रहपूर्वक करीत असतात. इतिहास-संशोधक राजवाडे प्रेमाच्या पृथक्करणाच्या भानगडींत पडले नाहींत. पण कवयित्री बयाबाई इचें रामदासांवर प्रेम कशाप्रकारचें होतें, याची चर्चा करण्याचा प्रसंग आला, तेव्हां मात्र राजवाडे यांनीं बयाबाईचें रामदासांवरील प्रेम प्लेटॉनिक ठरविलें आहे. लेखिकेनें प्रस्तुत कथेंत प्रेमविकासाच्या अनेक पायऱ्या मोठ्या सूक्ष्म निरीक्षणानें दाखविल्या आहेत.

१३. "रिकाम्या भांड्याचे निनाद" या लेखांत अगोदर सद्-बुद्धीची आणि चांगल्या भावनांची स्त्री प्रेमाच्या साम्राज्यांत हेलकावे खात खात कशी पतित झाली, म्हणजे फसविली गेली, हें दाखविलें आहे. दुष्ट मनुष्याच्या उत्पन्न केलेल्या गर्तेत तरुणी हट्टानें जाऊन झडप घालून पडतात, ही गोष्ट पाश्चात्य देशांत वारंवार अनुभवास येते. सुशिक्षित स्त्रियांच्या अल्प समाजांत हीच गोष्ट सुरू झाली आहे, याची साक्ष प्रस्तुत कथा देत आहे. ही कथा लिहितांना लेखिकेनें वाखाणण्यासारखी सहृदयता दाखविली आहे. वांकडें पाऊल पडलेल्या स्त्रिया म्हणजे अगदीं निराळ्या कोटींतल्या, अगदीं मूळच्याच वाईट, अशा तऱ्हेची स्त्री–स्वभावाची खोटी मीमांसा न करतां चांगल्या राहिलेल्या स्त्रिया म्हणजे केवळ अधिक भाग्यवान्, आणि विशिष्ट परिस्थितींत न सांपडलेल्या, अशाच तऱ्हेचें स्पष्टीकरण अधिक योग्य आहे, असें या प्रकारच्या कथा वाचून वाटेल. ज्या स्त्रियांचें वांकडें पाऊल पडलें आहे, अशा स्त्रिया नेहमीं वाईट वृत्तीनें भरलेल्या असतात, हें ज्याप्रमाणें सत्य नव्हे, त्याप्रमाणेंच स्त्रियांस आडमार्गानें नेणारे पुरुष हे देखील नेहमीं वाईट नसतात, ही गोष्ट लेखिकेनें ओळखली असेल किंवा नाहीं, हें सांगतां येत नाहीं. या कथेंत तरुणीच्या आयुष्याची माती करणारा पुरुष स्वार्थी

दूरदर्शी योजना करणारा दाखविला आहे. आणि तशा पुरुषाकडून देखील मूलतः चांगल्या प्रवृत्तीची स्त्री बिघडली गेली, यांत स्त्रीवर्गामध्यें प्रेरणेनें वाहात जाणारा आणि पुरुषाची परीक्षा न करणारा वर्ग असतो आणि तो फसतो, हें लेखिकेनें दाखविलें आहे.

१४. प्रस्तुत कथासंग्रहाची लेखिका सुशिक्षित आहे. तथापि त्यामुळें तिचें भाषामार्दव गेलें नाहीं. तिची सोप्या शब्दांनीं विचार करण्याची शक्ति नाहींशी झाली नाहीं. अनेक प्रसगीं जे विचार साध्या शब्दांत व्यक्त करतां येणार नाहींत, असें वाटलें होतें, ते विचार लेखिकेनें साध्या शब्दांनीं व्यक्त करून दाखविले आहेत. आणि त्यामुळें जाड्या शब्दांशिवाय ज्यांचें अडतें, अशा लेखकांना प्रस्तुत लेखिकेचें लिहिणे थोडें बोधक होईल, असें वाटतें.

साहित्यसेवी वर्गांत प्रविष्ट होऊं पहाणाऱ्या प्रस्तुत लेखिकेचे त्या वर्गाच्या असलेल्या व्यक्तींच्या तर्फेनें स्वागत करतों; आणि तिच्या मार्फत वाङ्मयाची सेवा याहूनही अधिक घडो, आणि महाराष्ट्रीय वाङ्मयाच्या गौरवाच्या वाढीसाठीं तिची लेखणी अधिकाधिक प्रवृत्त होवो असें इच्छितों.

१५. नवीन लेखकांस प्रेरणा करून, किंवा उत्तेजन देऊन, चांगलें वाङ्मय पुढें आणणाऱ्या तरुण प्रकाशकाचें देखील अभिनंदन करणें योग्य आहे. अगदीं नवीन लेखकांचे लेख—त्या कथा जरी असल्या तरी देखील—प्रसिद्ध करणें साहसच आहे. वाङ्मयाला नवीन वळण देण्याचें श्रेय जसें लेखकांस द्यावयास पाहिजे, तसें प्रकाशकासही द्यावयास पाहिजे. कारण नवीन लेखकांचें स्वागत करणारे प्रकाशक कांहीं वाटेवर पडले नाहींत !

ता. २८–५–१९३३.<br>कँन्टोन्मेंट, पुणें.

**श्रीधर व्यंकटेश केतकर.**

# अनुक्रमणिका







# कळ्यांचे निःश्वास



सुकलेल्या कळया ! त्यांना पाण्यांत भिजत घालून मोठ्या आशेनें मी त्यांच्या तोंडाकडे पाहूं लागलें. माझा नित्याचा हाच क्रम असे. सहानुभूतीचा सुखमय स्पर्श झाला म्हणजे अंग थरारतें. त्याप्रमाणें शीतल जीवनानें होरपळलेल्या त्या कळ्यांना किंचित् टवटवी येत असे. त्यांचीं कोमेजलेलीं तोंडं पाहून मला अगदीं गहिंवर येई. नेत्रांतील अश्रू कळ्यांना भिजवून पाण्यांत मिसळून जात. माझा हा क्रम पाहून कुणी मला फुलराणी म्हणत, तर कुणी फुलवेडी म्हणत.

कुणी कांहीं म्हणो. पण मी खरंच सांगतें, कीं त्या कळ्यांचं हृद्गत, त्यांची मुकी भाषा मला जितकी कळते, तितकी फार थोड्यांना समजत असेल. त्यांचे वायूवर विरणारे मूक निःश्वास मला जितक्या स्पष्टपणें ऐकूं येतात, तितके फार थोड्यांना येत असतील. माझा अवघा जन्म फुलांत आणि कळ्यांत गेलेला. तेव्हां त्यांचे दुःखाचे कढ व निराशेचे मुके बोल मला सहज समजतात. समान धर्मामुळें या गोष्टी होतात, असेंही वाटल्यास म्हणा.

सूर्यफुलें सूर्योदय पाह्यला किती उत्सुक असतात ! सूर्योदय झाला, एकदां तो दृष्टीस पडला, कीं क्षणाची उसंत न घेतां सूर्य जसजसा फिरेल, तसतशा माना हलवून तीं आपलीं हितगुजं एकदांचीं सांगून टाकतात. कोठपर्यंत ? अगदीं सूर्य दृष्टीआड होईपर्यंत ! तरी बिचाऱ्यांची तृप्ति होत नाहीं. सूर्य दृष्टीआड झाला, कीं बिचारीं हिरमुसलीं होऊन, एवढालीं तोंडं करून, दुःखानें मान टाकतात.

माझ्या कांहीं कळ्या अगदीं अशा आहेत. मला पाहून त्यांना काय सांगूं नि काय नाहीं असं होतं. मी जायला लागलें, कीं त्या अगदीं हिरमुसल्या होतात, आणि म्हणतात सुद्धां, " हें ग काय ?

आतांच कसली जातेस ?" पण या इवल्याल्या कळयांचीं दुःखं पण इवलालींच.

दुःखानें वेंधून ज्यांना मुक्याच बनवल्या, अशा कळया कुठल्या दिवसभर बोलणार? त्यांचीं दुःखं त्यांच्या चेहेऱ्यावर मुद्रित झालेलीं असतात. त्यांच्याकडे पाहून माझ्या पोटांत कालवाकालव होते. वाटतं मुक्या दुःखानं या कळया कायमच्या करपतील. यांनीं एक तरी अश्रू गाळावा, एक तरी शब्द बोलावा.

याच इच्छेनें, काळजीपूर्वक मीं त्यांच्याकडे टक लावून बघतें. माझ्या अश्रूंचा स्पर्श झाला, कीं त्या कळया टवटवीत होतात आणि आपली मनोव्यथा मजपाशीं सांगून दुःख हलकं करतात. त्यांचं दुःख दुसरे कोण विचारणार? आणि खरं म्हणजे त्यांच्याबद्दल लिहून तरी काय करायचं? कुणाला त्यांची पर्वा वाटते? कोण सहानुभूतीनें पाहातो? एवढी पर्वा नि सहानुभूति असती, तर या कळयांना सुकण्याचं, आणि पायदळीं पडून निर्माल्य होण्याचं काय कारण होतं?

असं जरी मी म्हटलं, तरी पण ज्या कळया माझ्या डोळयांदेखत सुकल्या, सुकत आहेत आणि सुकणार, त्यांबद्दल माझ्यासारख्या फुलवेडीला कां बरं वाईट वाटणार नाहीं? मला वाईट वाटतं, म्हणूनच मी त्या कळयांच्या गोष्टी बोलतें.

आपण सुंदरपणें उमलावं, हंसावं, डुलावं, आपला सुगंध दरवळावा, असाच कळीचा जीवन-हेतु. त्याला ती बिचारी अगदीं गुपित म्हणून हृदयाशीं धरून असते. ती बाकी कांहीं बोलली तरी अंतः-करणाच्या पेटींत मोहोर करून ठेवलेली ही एक गोष्ट. ती अगदीं दुसऱ्याला दाद द्यायची नाहीं या बाबतींत. जगाला काय माहीत? त्याला कळी सुकली एवढंच दिसणार? कोण पहातो ती कां सुकली तें?

कधीं दंवबिंदूंनीं कळीला छेडल्यानें ती विद्ध होऊन सुकेल, तर कधीं पुढच्या गोड स्वप्नांत गुंगून मायघरीं मायेच्या अंकावर असतांच ती वणव्यांत सांपडेल; कोणी मोठ्या प्रीतीनें तिच्या कोंवळ्या गळ्याला नख लावील; तर कोणी तिला मस्तकीं धारण करण्याचें मिष दाखवून, आपल्या मस्तकांतील कुविचारांच्या धगीनें तिला करपवील; कधीं झंझावाताचा धांगडधिंगा सहन न झाल्यानें ती गळून पडेल तर कधीं अंगच्या भित्रेपणानें, नाहीं तर अंगदोषानें जागच्या जागीं काळवंडून जाईल; एक ना दोन; कितीक कारणं कितीक कळ्यांना सुकवतात.

कळ्या सुकल्या, गळून पडल्या. लोक क्षिती न बाळगतां त्यांना तुडवून पुढें गेले. त्या दंवबिंदूंना, वणव्याला, वायूला व कुविचारी मस्तकाला कोण दोष देणार ? आणि कोण एवढं पहातो ? कुणी नुसतंच म्हणतील, " काय या कळ्या ! अगदींच खुरटलेल्या ! कधीं फुलायच्या म्हणून नाहींत. जातच वाईट ! " कुणाकुणाला कळी फुलायला आणि फळ धरायला पाहिजे असतें. ते म्हणतील, " अं:, रोगटच जात ही. "

नसली जात वाईट, अंगदोष नसला, तरी मुकी सुकुमार कळी ' ही जातच वाईट ' असं म्हणणारांना काय सांगणार ? तिनें नुसता जगाचा उपहास ऐकून दुःखाचा निःश्वास टाकून सुकायचें. तिच्या निःश्वासाबरोबर निःश्वास टाकणारा आणि तिचे मुके बोल उमजणारा एकादाच फुलवेडा निघायचा. एकादा कसलेला सहृदय माळीच तिच्या हृद्रोगाचीं कारणें उकलायचा.

मग कुणी म्हणेल, " तूं कुठें कसलेली माळीण आहेस ? " नसेन. पण सहृदयतेला काय अशक्य आहे ? कळ्यांतच माझा उभा दिवस जातो. त्या सुकलेल्या पाहून मला वाईट वाटतं. ' ही जातच वाईट ' असं बेपर्वाईनें म्हणणारांचा आणि उपहास करणारांचा मला फार

राग येतो. उथळ दृष्टीनें उपहास करणाऱ्यानें दुःखित कळीला किती दुखवलं, हें त्याला कळत नसतं. तें तिचं तिलाच कळणार.

मग मी तरी कशाला लिहितें हें? माझं फुलांचं वेड कळ्यांना ठाऊक आहे. चांगल्या वाईट कळ्याही मला ओळखतात. त्यांच्यांतच माझा जन्म गेलेला. त्यांच्याशीं मी बोलतें तेव्हां त्या म्हणतात, ‘ ताई, तूं फुलवेडी तर खरींच, पण वेडीही आहेस बाई. अग ! तुला सगळ्या कळ्यांचं हितगुज आणि मन कळायला तूं का मनकवडी आहेस ! ”

खरं आहे. मी नाहींच मनकवडी. पण मी तरी कुठें सगळ्या कळ्यांच्या गोष्टी लिहितें? ज्या सुकलेल्या कळ्या माझे झरणारे अश्रु पाहून माझ्याशीं बोलल्या व बोलतात, ज्यांचे जीव कसे सुकले हें मला माहीत आहे, त्यांच्याबद्दलच मी बोलतें.

आणि तुम्हीही नाहीं का माझ्याशीं हितगुज करणार? लोकनिंदेला वाटत नसली, तरी तुमच्या जातीबद्दल तुम्हांला कशी सहानुभूति वाटत नसेल? सबंध दिवस दुःखाच्या तिरमींत काढून संध्याकाळच्या वेळीं या मैत्रिणीशीं तुम्हीं नाहीं का आपलं दुःख हलकं करणार?

माझ्या कळ्या सुकल्या तरी मी नाहीं त्यांची अवहेलना करींत. अगदीं जातीच्या वाईट कळ्यांबद्दल सुद्धां मला वाईट वाटतं. त्या सुकल्या, तरी मी नाहीं त्यांना पायदळीं तुडवणार. कळ्यांनीं उमलावं म्हणून कितीदां मी रात्रीं त्यांना पाण्यांत टाकलं आहे. मग किती तरी कळ्या रात्रींच मजकडे पाहून पुनः खुदकन् हंसल्या आहेत. मी त्यांच्याच गोष्टी देऊं का? पण ज्या हंसल्या त्यांच्या दुःखाच्या गोष्टी मी नाहींच देत. पाण्यांतही टाकून ज्या उमलल्या नाहींत, पण माझ्या आस्थेमुळें ज्यांनीं आपलं हृद्गत माझ्याजवळ सांगितलं, तेंच आणि तसंच मी सांगतें.

त्या ऐकायच्या पूर्वी मीं मागें सांगितलं तें विसरूं नका हो,

नाहींतर म्हणाल, “ हें काय या कळ्यांच्या साऱ्या गोष्टी प्रेमाच्या ! या करतांच का या सुकल्या ?” पण असं म्हणून उपहास नका करूं. कळ्यांचीं स्वप्नं फुलण्याचींच असायचीं. त्यांनीं फुलायच्याच गोष्टी बोलावयाच्या. तेंच त्यांचं जिव्हाळ्याचं गुपित. वर वर त्यांनीं दुसऱ्या अनेक गोष्टी केल्या, तरी हृदयांतील गोष्ट हीच. प्रेमाचीच गोष्ट. पण त्यांत कितीक तऱ्हा ! सहज रानांत जावं, जिकडे तिकडे हिरवी गार वनश्री दिसावी; पण हिरव्या हिरव्या रंगांत तरी कितीछटा. एक हिरवा रंग कांहीं दुसऱ्यासारखा नाहीं दिसायचा. तसंच इथें. सुकलेल्या या कळ्यांच्या गोष्टी फुलण्याच्या, प्रेमाच्या व निराशेच्या असल्या तरी त्यांत कितीक तऱ्हा आहेत ! त्या सगळ्याच कांहीं मी तुम्हांला सांगत नाहीं. अफाट पसरलेल्या मानवजातीइतकींच प्रेमदुःखेंही अपार आहेत. तुम्ही तरी काय काय आणि किती ऐकाल ? माझ्या कळ्यांचं दुःख माझ्या हृदयांतून आजचा दिवस तरी कमी करावं, एवढ्यापुरत्याच मी कांहीं गोष्टीं तुम्हांला सांगतें.

पण हें पहा ! मी पाण्यांत टाकलेल्या या कळ्या निःश्वास टाकूं लागल्या ! तुम्हांला नाहीं ऐकायला येत ? अगबाई, त्या बोलायला पण लागल्या ! !

---

# त्याग !

++++

बागतून वहाणाऱ्या पाटाच्या कडेला मीं बसलें होतें. पण मस्तक सुन्न झालं होतं. इतकीं फुलं तिथें उमललेलीं, पण एकाही फुलानें माझें चित्त आज ओढून घेतलं नाहीं. इतकं हिरवं गार गवत गालिच्या-सारखं पसरलेलं, पण त्यानें माझं मन किंचितही फुललं नाहीं. त्या पाटाचं सुंदर स्वच्छ पाणी मनोवेधक क्रीडा करीत जात होतं, पण त्याच्या एकाही लहरीनें माझ्या मनाला रिझवलं नाहीं. मनांत माजलेल्या गोंधळानें कानशिलं तप्त झाल्याचा माझा मलाच भास होऊं लागला. पोटांत एक प्रकारची कालवाकालव होत होती.

दोन तऱ्हेच्या विचारांनीं माझं मन हादरून गेलं होतं. दारिद्र्यानें पीडलेलं व पिळलेलं आईबापांचं अंतःकरण एकीकडे व माझ्या वैयक्तिक भावनांनीं छेडून विव्हल केलेलं माझं अंतःकरण दुसरीकडे: अशी स्थिति झाली होती.

घरांत माझीं चार भावंडं माझ्यापेक्षां लहान. लहान म्हणजे इतकीं कीं, त्यांपैकीं एकानेंही अजून हायस्कूलची मजल पुरी केलेली नव्हती; वडलांना मिळणार शंपन्नास रुपये. ते ग्रॅज्युएट व त्यांना शिक्षणाची आवड. आपल्या कुटुंबानें नांव काढावं, ही त्यांना केवढी तळमळ ! पण दैवाचे लागेबांधे कांहीं विचित्र असतात. मी सर्वांत मोठी. मी ग्रॅज्युएट झालेली होतें व माझ्या इतर भावंडांत व माझ्यांत वयाचं इतकं अंतर होतं, कीं वडलांच्या कुटुंबाला त्यांच्या हयातींत एकाही मुला-कडून हातभार लागण्याचा संभव नव्हता. वडलांच्या पूर्ववयांत माझा जन्म. आणि त्यांच्या उतारवयांत दोन दोन वर्षांच्या अंतरानें चार मुलं झालेलीं. अर्थात् न कळतां अगर न बोलतां ही जबाव-दारी माझ्यावरच पडली. वडील पेन्शनीला आलेले. मुलं तर

नुकतीच भुईंतून वर येत असलेलीं. अशा स्थितींत घरची स्थिति न उमगणें म्हणजे माझ्यासारखी अधम मीच; या विचारांनीं मी संसाराला मदत करीत होतें.

त्या मदतीची किती जरूरी होती, हें बोलून दाखविण्याची मुळींच आवश्यकता नव्हती. आईदादांना ती कळत नव्हती, असं नाहीं. त्या दोघांनाही संसाराची विलक्षण काळजी लागलेली मला दिसे. त्यांची ती तळमळ पाहून माझ्या पोटांत तुटत असे. विशेषतः मुलीच्या मदतीनें आपला संसार चालवावा लागतो, हें शल्य त्यांच्या हृदयांत सारखें बोंचत असे. वस्तुस्थिति पहातां मी जरी मदत करीत असलें अगर तिची घरांत अतिशय जरूरी असली, तरी लोकांनीं तसं बोलून व्रणावर आघात केल्यानें, आधींच व्यथित झालेलीं आईदादांचीं अंतःकरणं जास्तच हळुवार झालीं असल्यास नवल नाहीं.

'आतां मुलगी कधीं उजवणार'? असा कोणी सहज प्रश्न विचारला, तरी त्यांना वाटे, आमच्या स्वार्थाकरितां आम्ही मुलीचं मुद्दाम लग्न करीत नाहीं, असाच म्हणणाऱ्याचा रोख आहे. यामुळें सहाजिकच दोघेंही जरा चिडत; एवढेंच नव्हे, तर माझ्याशीं वागतांना सुद्धां त्या चिडण्याची छाया त्यांच्या चर्येवर दिसून येई. तरी मी नेहमीं म्हणे, आई तुम्ही काय एवढं मनावर घेतां ? लोकांच्या ओंजळीनं कां आपल्याला पाणी प्यायचं आहे ? उद्यां आपल्या कुटुंबानें नांव काढलं, कीं लोकं कौतुकही करायला तयारच असतील. मग आजच्या त्यांच्या निंदेकडे कशाला लक्ष द्यायचं ? दुसरं असं, कीं लोक जोंपर्यंत आपल्याला कांहीं आणून देत नाहींत, तोंपर्यंत त्यांच्या शब्दालाही किंमत नाहीं. आणि मला स्वतःलाच जोंपर्यंत त्याचं कांहीं वाटत नाहीं, तोंपर्यंत तुम्ही तरी कां एवढं मनाला लावून घेतां ?
माझ्या अशा बोलण्यानें आईदादांचं समाधान होई पण कित्येक वेळा

अशाही येत असत, कीं ज्या वेळीं माझ्या वागणुकींत देखील त्यांना कांहीं टोंचण्यासारखें दिसे. याचं कारण खरं म्हटलं, तर माझी वागणूक हें नसून, त्यांच्या मनाची झालेली विकृत अवस्था हेंच असावं.

सहजींचीच गोष्ट म्हणून सांगतें. बोलतां बोलतां मीं म्हटलं, " मालीला दीडशें रुपये मिळतात, ती एक कवडीसुद्धां घरांत देत नाहीं: सारे चैन करीत असते. " यांत खरं पहातां, मला घरच्या दारिद्र्याला उद्देशून कांहींच बोलायचं नसून, मालीचा उधळा स्वभाव दाखवायचा होता. पण मी असं बोलतांच दादांनीं व आईनीं एकमेकांकडे पाहिलं. आई तर लगेच म्हणालीसुद्धां " आमचं आहे ना अठरा विश्वे दारिद्र्य ! " तिच्या डोळ्याला टचकन् पाणी आलं. मलाही वाईट वाटलं. सहजासहजीं बोलण्यांत सुद्धां त्यांना पुष्कळ वेळां वांकडेपणा वाटे, आणि मलाही कधीं कधीं त्यांच्या विनाकारण संशयी स्वभावाची जिकीर येई.

कधीं कधीं आई म्हणे, " कांहीं झालं, तरी मुली त्या मुली व मुलगे ते मुलगे ! " प्रथम प्रथम मला असल्या बोलण्याचा रागही येई: कारण त्यांची मनःस्थिति मला बरोबर कळत नसे. मला वाटे, " असता अगदीं मोठा मुलगा, तर याहून त्यानें काय मदत केली असती ? " मी तर नोकरीशिवाय शिकवण्याही करीत होतें. इतकं करूनही जर आई-दादांचं समाधान नाहीं, तर त्यांच्या मनाचाच तो दोष. महिन्याच्या महिन्याला मला जो पगार मिळे, तो मी तसाच त्यांच्या स्वाधीन करीं. 'मी मिळवती, म्हणून माझ्याकरितां ही अमुक गोष्ट मी करणार,' असं मी कधींच म्हटलं नाहीं. मुलानें असं कधीं केलं असतं का ? माझ्या लहान भावंडांत आणि माझ्यांत सारखाच आज्ञाधारकपणा होता. कोणतीही बारीकशी गोष्ट सुद्धां आईदादांना विचारल्याशिवाय किंवा कळवल्याशिवाय मीं केली नाहीं. इतका अर्ध्या वचनांत मुलगा तरी राहिला

असता का? त्यामुळें आई जेव्हां 'मुलगे ते मुलगे व मुली त्या मुली' म्हणे, तेव्हां पक्षपाताशिवाय दुसरं समर्पक कारण मला कोणतंच दिसत नसे.

कधीं कधीं खूप विचार केला म्हणजे मी असं समाधान मानी कीं त्यांचंही बरोबर आहे. आईबापांना मुलांनीं मिळवून दिलं तर तें त्यांचं कर्तव्यच ठरतं; जगाला हंसण्यासारखं त्यांत कांहींच वाटत नाहीं. आईबापांनाही त्यामुळें मान खालीं घालण्याचा प्रसंग येत नाहीं. पण हींच मुलीनें मदत केली तर 'स्वार्थासाठीं मुलीला अविवाहित ठेवली.' असं लोक म्हणतात व लोकांची लाज वाटल्याशिवाय रहात नाहीं. यामुळेंच आईदादा असं म्हणत असावे. आणि तें सहाजिकही आहे. अशा बोलण्यामुळें लोकांनीं सतत त्यांचं मन विकृत, संशयी व हळुवार बनविल्यावर, माझ्याकडे पहाण्याची त्यांची दृष्टि दूषित झाल्यास नवल काय?

दारिद्र्यानें गांजलेल्या आईवडिलांनीं कोणाकडून कवडीचीही आशा केली नव्हती. आणि दारिद्र्यांत स्वाभिमानाला जास्तच तीक्ष्ण धार असते, त्यामुळें यत्किंचित् कोणाचे उपकारही डोईजड वाटूं लागतात. आईदादा संतापलीं कीं म्हणतही, 'नातेवाईकांची मदत ना, मुळींच नको. सुतळीचा तोडासुद्धां त्यांचा आमच्याकडे नको! आमचंच जाऊं द्या त्यांच्याकडे. पण त्यांचे काडीचे उपकार घ्या नि कपाळ झिजवा, सांगितलंय कोणी एवढं? ज्यांचे होताहेत उपकार तेच कसे फिटतील या जन्मीं कोणास माहीत!' अर्थात् शेवटचा हा रोंख माझ्यावर आहेसें मला वाटे आणि मला तें असह्य होई. मी म्हणे सुद्धां, "आई, तूं सुद्धां असं काय म्हणतेस? इतरांच्याबद्दल तूं बोलतेस तें ठीक आहे, पण असले टोमणे मला कशाला देतां?"

काय असेल तें असो. त्यांच्या स्वाभिमानाला आलेली धार व लोकांची बोलणीं, यामुळें हें गाडं माझ्यावर अधिकाधिक उरफाटूं

लागलं. माझंही मन विटूं लागलं. पण कांहीं झालं तरी आईदादांचं मजवरील अगर माझं त्यांच्यावरील प्रेम अलोट होतं. त्यामुळं मन विटलं, तरी प्रेमाचा प्रभाव अधिक असल्यानें, मनावर आलेलं हें पटल निघून जाण्याला फार वेळ लागत नसे. असंच किती दिवस चाललं होतं; पण एवढं मात्र खरं, कीं कांहीं बाबतींत आम्ही स्पष्ट मनमोकळीं बोलत नाहींशीं झालों. त्यामुळें अशा संदिग्धतेंतून गैर-समजाचीं जाळीं विणलीं जाऊं लागलीं व जेव्हां कधीं त्यांत मन गुरफटे, तेव्हां त्या मनस्तापाला सीमा उरत नसे. मग मन शांत करण्यासाठीं मी कुठें तरी एकांत जागीं जाऊन बसें; पण तशा अवस्थेंत सृष्टीचं सौंदर्यसुद्धां माझ्या डोळ्यांना विषाप्रमाणें वाटल्यास नवल कोणतं ?

पण नेहमीच्याही मनस्तापापेक्षां त्या दिवशींचा मनस्ताप कांहीं वेगळाच होता व त्याला कारणंही तशींच होतीं. मला एक स्थळ सांगून आलं होतं. मलाही असं वाटूं लागलं होतं, कीं एवीं तेवीं घरांत असं चालतं, मग मींच होऊन यांतून कां सुटूं नये? या विचारानेंच मला दादांनीं त्या स्थळाबद्दल विचारतांच, मीही 'बरं विचार करतें!' असं म्हटलं. त्या दिवशीं जणूं कोणी कड्यावरून लोटायला काढली आहे, किंवा वाघाच्या जबड्यांत द्यायला उभी केली आहे, अशी भेदरलेली अवस्था माझ्या मनाची झाली होती. लग्नाची विशेषतः अनोळखी वराची मला इतकी भीति वाटत होती कीं, कांहीं सांगतां येत नाहीं; त्यामुळें 'होय' हीं अक्षरें छपन्न वेळां मनानें वावटळी सारखीं उडवून लावलीं. दादांनीं तर असं म्हटलं कीं, "सर्व बाजूंनीं स्थळ चांगलं आहे व लोकही नांवं ठेवतात. बरं, कधीं तरी ही गोष्ट करावयाचीच आहे, तेव्हां या दृष्टीनें तूं विचार कर." मीही सुस्थळ म्हणून विचार करीत होतें. तरीही मनाची बावरलेली अवस्था कशी झाली होती, हें कळायला प्रौढ कुमारिकाच व्हायला पाहिजे.

त्या दिवशीं रात्रीं मी नित्याप्रमाणें निजलें; पण झोंप कशी तीं येईना. उगीच आपलं डोळे मिटल्याचें आणि झोंप लागल्याचं सोंग केलं. दोनाचा ठोका ऐकला, तरी झोंप लागली नाहीं. डोकं अगदीं भणाणून गेलं होतं. शेवटीं एकप्रकारें ग्लानिच म्हण ना, पण एकच तास डोळा लागला; आणि पुनः जागी झालें, तीं आईचा हुंदका ऐकून! पोटांत चर्र झालं. पण जागेपणाचीं कांहीं चिन्हं न दाखवतां मी आईदादांचीं बोलणीं ऐकूं लागलें.

"कांहीं झालं तरी लग्न हें केव्हां तरी व्हायचंच अन् तें व्हायलाच पाहिजे. आतां हुंड्याचाच प्रश्न आला तर काय करायचं?"

आईनें सुस्कारा टाकला. दादांनींही टाकला. माझ्या पोटांत कालवूं लागलं. काय करणार बिचारीं! माझ्या एकटीसाठीं त्यांच्या संसाराचं मी स्मशान बनवणार ना? माझं हृदय भरून आलं. त्या-बरोबर एकदां वाटलं, कीं उठून आईला सांगावं, कीं "आई, तुम्हीं अगदीं काळजी करूं नका. मला मुळींच लग्न करायचं नाहीं." पण तसं बोलायला ती वेळही योग्य नव्हती. म्हणून मी तशीच पडून राहिलें. पाहूं या आणखी काय बोलताहेत तें. त्यांचीं मनं तरी मोकळीं होऊं द्यावीं.

शेवटीं आईच निश्चयानें म्हणाली, "तें कांहीं नाहीं, एकदांच निश्चय केला पाहिजे. आपण संसार वाढविला, तर त्याची विल्हेवाट बरीवाईट कशी तरी आपणच लावली पाहिजे. त्याला दुसऱ्याची अपेक्षा कशाला ठेवावी? झालं एवढं पुष्कळ झालं."

"हो, पण आजच इतका प्रश्न आला आहे, असं मला वाटत नाहीं. ती काय ठरवते तें पाहूं. त्यावर सगळं अवलंबून आहे."

"तिनें होय म्हटल्यावर कां मग विचार करायचा आहे? तीं होय म्हणणार, असंच धरून चाललं पाहिजे. बोलून चालून मुलगी दुसऱ्याचं धन. तें किती दिवस आपल्याला लाभणार? मुलीला

शिकवलं अन् मुलाला शिकवलं, तरी मुलगी ती मुलगी आणि मुलगा तो मुलगा, हेंच खरं ! ''

आज मला आईच्या या म्हणण्याचा उमज पडला. मला कसंसंच झालं. माझ्या 'होय' म्हणण्यानें उद्यां घरांत कशी काळजी निर्माण होणार, याची कल्पना मला आली. माझीं लहान लहान चार भावंडं, उतार वयाचे वडील व आई, यांना भर समुद्रांत नेऊन त्यांचीं वल्हीं मी काढून घेणार ! देवा, कशाला मला जन्माला घातलंस मुलीच्या ? मुलानें लग्न केलं, तर तो घरांत राहतो आणि मुलगी परघरीं जाते: मग गरीब आईबापांनीं जीवाचं रान करून मुलांमुलींना सारखं शिक्षण कसं द्यावं ? या व अशासारख्या विचारांत ती रात्र उजाडली.

त्या दिवशीं बागेंतील पाटाच्या कडेला बसून, माझ्या आई वडलांच्या कुटुंबाची व माझी भवितव्यता यांबद्दल माझे मनांत झगडा चालला होता. शेवटीं मीं घरीं परतलें. मी मनाशीं कायम केलेल्या निश्चयामुळें मला एक प्रकारचें विलक्षण समाधान वाटत होतें. मीं दादांना म्हटलं, ''पुष्कळ विचार करून माझा विचार कायम ठरला आहे. मला कांहीं इतक्यांत लग्न करायचं नाहीं. ''

एका रात्रींत पराकाष्ठेच्या काळजीनें माझ्याप्रमाणेंच दग्ध झालेल्या आईबापांना-निदान त्या दिवसापुरतं किंचित् समाधान लाभलं असेल. माझ्या निश्चयामुळें मला अगोदर लाभलेल्या विलक्षण समाधानांत त्यांच्या समाधानानें भरच पडल्याशिवाय राहिली नाहीं. एक प्रकारच्या तुलनेनें, मला माझे आईवडील इतर कित्येक ठिकाणीं दिसणाऱ्या आईबापांपेक्षां श्रेष्ठ वाटूं लागले. पुष्कळ मुली मला अशा माहीत आहेत, कीं त्यांचे आईबाप घरच्या अडचणींसाठीं त्यांना स्पष्टपणें लग्न न करण्याबद्दल बजावतात; किंवा आपली दुःखद कहाणी त्यांच्यापुढें उभी करून या नाहीं त्या रीतीनें त्यांना अविवाहित राहण्यास भाग पाडतात.

मला असं वाटूं लागलं कीं, माझे दादा कितीतरी चांगले आहेत ! त्यांनीं अशी सक्ति माझ्यावर कधींच केली नाहीं. उलट माझं चांगलं व्हावं, लग्न होऊन माझ्या मनाप्रमाणें व ध्येयाप्रमाणें माझं आयुष्य जावं, अशी तळमळ लागलेली त्यांच्या वागण्यांत मला नेहमीं दिसल्याशिवाय रहात नसे. एक प्रकारें दारिद्र्यदुःखाच्या असहाय परिस्थितींत सांपडल्यामुळें, माझ्या लग्नाचा प्रश्न त्यांना स्वतःच्या व प्रपंचाच्या भवितव्याबद्दल चिंतातुर करीत असला, तर तो त्यांचा दोष कसा म्हणतां येईल ? आईदादा बिचारीं परिस्थितीपुढें काय करणार ? त्यांनीं काय तो विचार ठरवायला मला मोकळीक ठेवली होती ना ? झालं तर मग. माझ्या स्वतंत्र विचारानेंच मला वाटूं लागलं, कीं ज्यांनीं मला हाल सोसून लहानाची मोठी केली व इतका विचार करण्याची पात्रता आणून दिली, त्या माझ्या आईदादांना म्हातारपणीं ज्यामुळें यत्किंचितही त्रास होईल, असं मी कांहींही करणार नाहीं. लग्न करून स्वतःचंच सुख पहाणं म्हणजे निव्वळ स्वार्थीपणा होय, असं माझं मलाच आतां वाटूं लागलं. आणि म्हणूनच लग्न न करण्याच्या निश्चयानें मला अतिशय समाधान प्राप्त झालं. परमेश्वरा ! स्वार्थत्यागाचं हें समाधान पुढें असंच कायम टिकेल ना ?

---

# अंतःकरणाचे रत्नदीप

हें माझ्याच भावानें लिहिलेलं पत्र का? तीन तीन वेळां मीं सहीकडं पाहिलं. होय. माझ्या नानाचंच तें पत्र होतं. नाना! तुला कसं इतकं निष्ठुरतेनं मला लिहवलं? जर रेखामात्र माझ्या मनाची कल्पना केली असतीस, क्षणभर जर माझ्या भूमिकेशीं समरस झाला असतास, तरी तुला इतक्या कठोरपणें मला लिहितां आलं नसतं. तुझी लेखणी अडली असती. आजपर्यंत वीस बावीस वर्षं ज्यानें मला प्रत्यहीं पाहिलं, ज्यानें माझं अनेक गोष्टींबद्दल कौतुक केलं, त्याला माझी मनःस्थिति जाणणं मुळींच कठीण गेलं नसतं.

"तूं आजपासून आमची कोणी नाहींस, आणि तुझीं कोणी नाहीं. यापुढें तुला एका कवडीचीही मदत आमच्याकडून होणार नाहीं. यमू घर सोडून तुला वर्ष झालं नाहीं, तों तूं आपले प्रताप गाजवायला सुरवात केलीस. तुला बहीण तरी कोणत्या तोंडानें म्हणूं?"

नाना, तुझं नि आईचं मन मला कळत का रे नाहीं? त्याबद्दल मी विचार केला नाहीं असं का तूं समजतोस? पण मी तरी काय करणार? नकोच मला बहीण म्हणूं. ही यमू मेली, तुम्हांला पारखी झाली असंच समजा. पण एकदां मनाशीं विचार करा, कीं मीं तरी काय करावं?

नानाच्या पत्रानें माझ्या मनांत काहूर उठलं. कॉलेजमध्यें नानाचं पत्र मिळाल्यावर प्रोफेसरांच्या एका शब्दाकडे माझं लक्ष असेल तर शपथ. वर्गांत शें-दीडशें पोरं. पण जणुं निर्जन ठिकाणीं मी एकटीच असल्याप्रमाणें, माझ्याच विचारांत मी मग्न झालें होतं. शेवटीं एकदांचा तास संपला. डोळयांत भारावलेल्या अश्रूंना मोकळी वाट देऊन केव्हां एकदां मन हलकं करीनसं झालं होतं!

शेवटीं आमच्या खोलींत येऊन मी आरामखुर्चीवर अंग टाकलं व डोळ्यावर हात धरून सपशेल मनमुराद रडलें. नानाचं हें पत्र यायच्या आधींसुद्धां, माझ्या मनांतील विचारांच्या कल्लोळांनीं मधून मधून अश्रू गाळतांना, मला माझ्या मैत्रीणींनीं पाहिलं होतं. एवढंच काय, पण माझ्या या मनःसंतापाचं कारणही आडून आडून प्रत्येक मुलीला कळलं होतं. माझ्या नेहमीं आनंदी असणाऱ्या चेहऱ्यावर या सहामाहींत आलेलीं चिंतेचीं अभ्रं व वेळीं अवेळीं होणारा अश्रुवर्षाव यामुळें सुमाताईच्या आणि शान्ताच्या मनांत माझ्याबद्दल सहानुभूतिही निर्माण झाली होती. त्यामुळें कधीं कधीं अगदींच जड झालेलं अंतःकरण त्यांच्याशीं बोलून मी हलकं करीत असें.

शांतानें माझ्या पाठीवर हात ठेवून मला विचारलं, " यमू कां रडतेस ? " मी कांहीं बोललें नाहीं. पण तिच्या त्या सहानुभूतीच्या आवाजानें मी अधिकच मुसमुसून रडूं लागलें." अशी रडूं नको गडे. सांग ना काय झालं तुला ? "

मीं तिच्यापुढें पत्र टाकलं. तें वाचून तीही दिङ्मूढ झाली. साहजिकच आहे. घरची कपर्दिकही मिळाली नाहीं, तर या यमूचं व्हायचं तरी काय ? हा प्रश्न तिच्यापुढेंहि आल्याशिवाय राहिला नसेल. अशा स्थितींत मला हवं तें बोलूं देण्यानेंच माझं सांत्वन होणार, हें शांताला पुरतं माहीत असावं आणि मी पण मनांत आलं तसं बोलत गेलें. मी म्हटलं, " शांते, पाहिलंस पत्र ? काय सांगणार तुला ? माझीच आई आणि माझाच भाऊ. त्यांची माया माझ्यावर नाहीं असं मी कसं म्हणूं ? त्यांनीं माझं केलं, तें नाहीं म्हणण्याइतकी मी अधम नाहीं. पण न कळतां का होईना, माझं मन लहानपणापासून कसं कसं दुखवलं गेलं आहे, हें सांगायला गेलें, तर एक ग्रंथच होईल. मी दुसऱ्या जातींतल्या माणसांशीं लग्न करण्यांत, आईला अन् नानाला केवढं मोठं संकट पडलं असेल, ही काय मला कल्पना नाहीं ? पण

आपल्या जातीचा व कुळाचा विचार करतांना तीं माझा प्रश्न गौण समजतात आणि मी तो तसा समजूं शकत नाहीं. त्याला कारण काय हें जर पाह्यला गेलं, तर माझ्याकडे तितकासा दोष येईलसं मला वाटत नाहीं.

आम्ही दोघी बहिणी. आम्ही सख्या बहिणी, पण आमच्यांत सर्वच बाबतींत फरक. मी दिसायला साधारण तर माझी बहीण, सुस्वरूप. मीं प्रेमळ आणि निगर्वी तर माझी बहीण तुसडी नि गर्विष्ठ. मी बुद्धीनें बऱ्यापैकीं तर माझी बहीण सामान्य. अशी आमची बहिणींची जोडी देवानें निर्माण केली होती. पण लहानपणासून केव्हांही दिसण्या-बद्दल बोलणीं निघत, तेव्हां सर्वांनीं म्हणावं, ' यमी ना ? आहे आपली कांहीं तरी ! ' मग माझ्या नाकाडोळयावर सगळीं घसरायचीं. कुणी म्हणे, " या यमीला कुणी पतकरीलसं नाहीं वाटत." असलीं बोलणीं ऐकून मी अगदीं रडवं तोंड करीं. तेव्हां नाना म्हणे, " यमे, नवरा नाहीं मिळाला तर नाहीं मिळाला, त्यांत एवढं रडवं तोंड करायला काय झालं ? आपलं खूप शिकावं, चांगलं हुशार व्हावं म्हणजे झालं. मग काय नवऱ्यांना तोटा ? " नानाच्या अशा प्रेमळ बोलण्यानें त्या वेळीं मला किती तरी बरं वाटे; हें घरांतच चाले तोपर्यंत ठीक होतं. पण कधीं कधीं याहूनही माझें मन खिन्न करणारी गोष्ट घडे. आमच्या घरीं कोणी नवखं माणूस आलं कीं, कुतूहलानें मी पुढें जाई. माझी बहीणही जाई. ' पण मला कितीही नीटनेटकी ठेवली, तरी मी चांगली दिसत नसें. त्याला मी तरी काय करणार ? अशा वेळीं आई नाहींतर नाना मला मोडून काढीत, " जा, कांहीं नको असा अवतार बाहेर यायला. " माझी बहीण मात्र पुढं गेली तरी तिला कोणाचा प्रतिबंध नसे.

एवढंच काय, ती एक दर्शनीय वस्तु म्हणून मुद्दाम लहानपणा-पासून नवख्या माणसापुढें नेली जाई. व बहुतेक सर्वच येणारीं जाणारीं माणसं म्हणत, " ही कोण ? या दोघी बहिणीच का ? किती फरक

आहे दोघींच्यांत.” या त्यांच्या बोलण्यानें माझा किती हिरमोड होत असे, हें त्यांना कसं कळणार ? नाहीं दिलं देवानं रूप, तर मी तरी काय करणार ? पण प्रत्येकानें तेवढ्यासाठीं माझा असा वीट कां करावा ? नेहमीं नेहमीं वाईट वाटण्याचा माझ्या मनावर शेवटीं असा परिणाम झाला, कीं साहजिकच कोणी आलं, म्हणजे मला वाटे, कशाला यांच्या दृष्टीस पडा ? आपण आपलं एकीकडे जाऊन बसावं. नवख्या माणसापुढें बुजून जाणं, ही मला संवयच जडली. माझ्या बहिणीला जितकी आपल्या रूपाची ऐट, तितकाच मला माझ्या रूपाचा वीट आला होता. त्यामुळें मुलींत साहजिकच दिसून येणारी नीटनेटके-पणाची आवड देखील माझ्यांतून पार नाहींशी झाली. मला अमक्याच रंगाचं लुगडं असावं, अशा अशा रंगाचं पोलकं असावं, माझ्या डोक्यांत तसल्याच रंगाचं फूल असावं, अमुक दागिना आपल्याला असावा, किंवा माझ्याकडे दुसऱ्याचं लक्ष वेधावं म्हणून आपण अमुक एक गोष्ट करावी, असं कधीं चुकून सुद्धां मला वाटलं नाहीं. या गोष्टी माझ्या मनाला वाव-ड्याच होत्या म्हणेनास. उलट, अशी एखादी गोष्ट घडली तर मला वाटे, बोलून चालून मी कुरूप. असला साज केला, तर चार लोक हंसतील मात्र. कांहीं तरी नेसायचं आणि कसं तरी रहायचं, हीच माझी अजूनही तऱ्हा आहे.

माझ्या बहिणीचा रूपगर्व, तिची नटण्यामुरडण्याची आवड व कधीं कधीं धिक्कारानें दुसऱ्याकडे पहाण्याची दृष्टि, हींही माझ्या लक्षांत आल्याशिवाय रहायचीं नाहींत. याच अभिमानानें तिचं अभ्यासाकडे किती दुर्लक्ष असतं आणि चार लोकांचं लक्ष वेधून घेण्यासाठीं ती किती धडपडते, हें मला माहीत आहे. तिच्या रूपाकडे जर कोणी दुर्लक्ष केलं, तर ती कशी चरफडे, तें पाहून मला मनांतल्या मनांत हंसूं आल्याशिवाय रहात नसे. माझं

भवितव्य काय आहे, तें मला कळून चुकलं होतं. शिकून, स्वावलंबी होऊन, असाच जन्म काढायची तयारी हवी; हें जाणतेपणीं मला कळूं लागलं. त्या दृष्टीनें माझा अभ्यास मी आजपर्यंत झटून करीत आलें. माझ्या आईनें नि नानानें माझ्या हुशारीबद्दल नेहेमीं कौतुकच केलं आहे. नाना तर म्हणायचा, " यमी हा आमचा भाऊच आहे एक." मला त्यावेळीं त्या म्हणण्याचा कधीं विषाद वाटला नाहीं. माझ्यासारख्या कुरूप मुलीला कोण पतकरणार? कुणाच्या गळयांत बांधलं जायचं तर जाडाजुडा हुंडा पाहिजे.

आमच्यांत हुंड्याचं बंड तर कांहीं विचारायलाच नको. ज्याला त्याला हुंडा हवा; पण घर पहायला गेलं, तर बाहेरून जितका भपका तितकंच आंतून पोकळ झालेलं. मग आम्ही तर मध्यम स्थितींतलीं माणसं. बरं, दीड दोन हजारांची भाषा तर आमच्यांत कोणीच बोलत नाहींत. जो उठतो, तो चार पांच हजारांवर बोलायचा. अशा स्थितींत आईबापांना मुलगी पदरीं असणं हें पूर्वजन्मींचं पातक वाटल्यास नवल काय? त्यांतून माझ्यासारख्या कुरूप मुली असाव्या; मग तर काय? दु:खाला आणि काळजीला सीमाच नाहीं. लग्नांत सुरेख मुलगी ही दर्शनी हुंडीच आहे. रूप पहातांच ती पटायची. मग तिच्यांत गुण असोत वा नसोत. खरं पाहिलं, तर रूप काय, चार दिवसांचं; खरं सौंदर्य गुणांचंच आणि तेंच टिकाऊ असतं. रूप आणि गुण एकत्र असलीं, तर दुधांत साखरच पडली म्हणायची. पण नुसत्याच रूपानें कुटुंबांतील परंपरागत गुणांची जपणूक होत नाहीं. अर्थात् मी असं बोलणं, म्हणजे माझ्या कुरूपाची वकिली करणं असंही कुणाला वाटेल. आणि मी तरी नाहीं कशाला म्हणूं? कदाचित् तें खरंही असेल.

आपलं हिंदु लग्न म्हणजे सट्टेगिरी. अशा स्थितींत माझ्यासारख्या कुरूप मुलीला हुंडा देण्याचं सामर्थ्य नसलं, तर तिनें लग्नाच्या

भानगडींत पडूं नये, असं म्हणणारे पाषाणहृदयी लोक कांहीं थोडे नसणार !

भावना या जगांत प्रत्येकालाच आहेत. पण आपल्या भावनांचीच केवळ ज्याला त्याला तीव्र जाणीव असते. दुसऱ्याला अंतःकरण आहे, अगर भावना आहेत, हें त्याला कधीं कळत नाहीं व कळवून घेण्याची इच्छाही नसते. शांते, खरं सांगूं का ? मला किती तरी वेळां वाटतं, कीं आई काय, बाप काय, भाऊ काय किंवा कोणी काय, सर्वांचें प्रेम आणि माया, स्वार्थानें थोडी बहुत तरी रंगलेली असते. कदाचित् तीं माझ्या स्वार्थाच्या आड येतात, म्हणूनही मी असं म्हणत असेन. या स्वार्थी वृत्तीला मी अपवाद आहें, असं माझं मुळींच म्हणणं नाहीं. सध्यां तोच प्रश्न आहे. आईला किंवा नानाला माझ्याबद्दल वाटणाऱ्या मायेच्या पोटीं, स्वतःच्या कुळाचा व जातीचा अभिमान तर आहेच; पण शिवाय 'माझ्या मुलीनें असं केलं.' 'माझ्या बहिणीनें असं केलं' असं म्हणवून घेण्यांत जो ममत्वाला धक्का बसतो, तोही एक त्यांना टोंचत असणार. जाती, कुळ, स्वतःचा दर्जा अथवा नांव याला कुठेंही कमीपणा येऊं नये, असं त्यांना वाटतं. हाही माझ्याबद्दल वाटणाऱ्या प्रेमांत त्यांचा एक प्रकारचा स्वार्थच नाहीं का ? शांते, तूं मला या विचारसरणीबद्दल अगदीं क्षुद्र म्हणशील. म्हण हवी तर. मी स्वतःलाच जर या बाबतींत पूर्ण स्वार्थी म्हणतें, तर तूं मनांतल्या मनांत तसं म्हणणं अगदीं साहजिक आहे. पण माझा जसा संपूर्ण स्वार्थ आहे, तसा माझं हित पहाण्याच्या दृष्टींत, त्यांचाही एक प्रकारचा स्वार्थ त्यांना न कळतां दडलेला आहे. कुटुंबाच्या हिताच्या दृष्टीनें तो स्वार्थ प्रत्येकांत असला पाहिजे; कुटुंबाच्या कल्याणाच्या दृष्टीनें तो चांगलाही आहे; एवढंच काय, पण त्यांच्या त्या स्वार्थामुळेंच मला आज शिक्षण घेतां येतं आहे अगर स्वावलंबी होतां येत आहे. पण त्यांच्या व्यापक स्वार्थापुढें माझ्या संकु-

चित स्वार्थाला मान लववणं अशक्य झालं आहे. त्याला मी तरी काय करूं? मला तर वाटतं, कीं माया, प्रेम हीं स्वार्थाचींच निरनिराळीं नांवें आहेत. त्यांच्या स्वार्थांत जाति, कुल, धर्म, तीं स्वतः व मीं इतकीं येतात. यांपैकीं कुणालाही धक्का लागूं नये असं त्यांना वाटतं. इतका व्यापक माझा स्वार्थ–प्रेम–नाहीं. माझ्या पुरतंच मला सध्यां दिसत आहे. हें अगदीं वावगं असलं, तरी नानानें त्याच्या स्वतःच्या प्रीतिविवाहांत आपल्या अंतःकरणाची साक्ष घेऊन ठेवली असेल, तर माझं करणं त्याला वावगं कां वाटावं? पण नानाला त्याचा विसर पडला आहे. त्याच्या भावना त्या वेळीं साहजिक होत्या, तशाच माझ्या भावना कां साहजिक म्हणायच्या नाहींत! केवळ ते दुसऱ्या जातीचे म्हणून?

आम्हां सारस्वतांची जात लहान अन् हुंड्याचं व रूपाचं विशेष माहात्म्य, म्हणून देवानें असं केलं असतं तर प्रश्नच नव्हता, कीं कुरूप माणसांना आपल्या असल्या भावनाच नसायच्या. पण असं कुठं आहे? रूप असूनहीं जेथें नेत्रांना रूप व कानांना रुपयांचें संगीत अशी साथ लागते, तेथें नेत्रांना कुरूपता निं कानांना स्मशान–शांतता असल्यावर काय विचारायचं आहे?

मला जोंपर्यंत अंतःकरण आहे, पण तुमच्याजवळ पैसा नाहीं अगर मजजवळ भुरळ पाडणारं रूप नाहीं, तोंपर्यंत हा प्रश्न नेहमींच्या बाजारी लग्नपद्धतीनें कसा सुटायचा? तो तुमच्या हातीं राहिला नाहीं. आणि मला जोंपर्यंत मन आहे, तोंपर्यंत केवळ वैवाहिक जीवनाकरतां कोणताही पुरुष पत्करणं तर मला शक्य नाहीं ना? उद्यां माझ्या कुरूपपणाला कंटाळून त्यानें माझा त्याग केला तर? अशा स्थितींत काय करणार? नाना काय, आई काय, किंवा समाज काय, माझ्यासारख्या मुलीला माझ्या आचरणाबद्दल हीन लेखतील; पण त्यांना 'तुम्ही माझा प्रश्न कसा सोडवणार' असं विचारलं तर?

शांते, आम्हांला एकीकडे वाटतं, कीं प्रौढ विवाह असावेत. दुसरीकडे मुली प्रौढ झाल्या, तरी कळसूत्री बाहुल्याप्रमाणें त्यांनीं आईबापांच्या म्हणण्याला मान तुकवावी, असंही आम्हांला वाटतं. हीं दोन्ही कशीं जुळायचीं ? आम्हांला प्रौढ विवाह पाहिजेत; पण त्याबरोबरचीं सांकडीं मात्र नकोत. हें कसं जमेल ? स्त्री-पुरुषांचं मोकळेपणीं बोलणं चालणं सुद्धां आम्हांला पाप वाटतं. विचारी आईबापांना मुलींचं लग्न करतां येत नाहीं; कारण मुलींचं मन आडवं येतं. बरं, मुलीच्या मनाप्रमाणें करा-यचं म्हटलं, तर मुलीला निवड करायला क्षेत्रही आम्हीं देऊं शकत नाहीं. आमच्यांत स्त्री-पुरुषांनीं एकत्र मिसळणं तर बाजूलाच राहो; पण प्रसंगानें बोलले, तरीही कुत्सित दृष्टि गरळ ओकल्याशिवाय राहात नाहीं. त्यामुळें नीति ही अनीति ठरण्याचा संभव. अशा रीतीनें सगळयाच बाजूंनीं अडवणूक. आणि या प्रेमभावना वयाबरोबर यायच्याच. मग करायचं काय ? मी नाहीं कुणाची पर्वा करणार.

नसेल माझ्या ठिकाणीं रूप. पण अंतःकरणाचा पवित्र दीप तर आहे ना ? माझ्या नेत्रांच्या पुष्करणींत अंतःकरणाचं कांहींच आक-र्षक प्रतिबिंब पडणार नाहीं का ? तें पाहून ज्याचे अंतःश्चक्षु माझ्याकडे येतील, त्यालाच मी पतकरीन. माझ्या अंतःकरणाच्या दीपाच्या उजेडांत, ज्याला आपल्या आयुष्याचा मार्ग स्वच्छ व स्पष्ट दिसेल, त्यानेंच मला पतकरावं. ज्याच्या अंतःकरणाचे नेत्र मला खेंचतील, त्यालाच मी ‘ माझा ’ म्हणेन. मी सारस्वत असेन, ते प्रभु असतील. मला नाहीं त्याची पर्वा वाटत. कारण जोंपर्यंत कोणी कोणाला अडचणींतून वाट काढून सुखाचं जीवन देऊं शकत नाहीं, जोंपर्यंत माझं सुख मी शोधल्याशिवाय सांपडूं शकत नाहीं, तोंपर्यंत माझ्या पद्धतीनेंच मी तें शोधणार ? “ तूं त्या सुखाची आशाच करूं नयेस ” हें म्हणणं पटेल त्याला पटेल. मला तरी पटत नाहीं.

शून्य अंधकारमय भवितव्यांत मला सुखाचा दीप दिसला, तर मी

त्याकडे कां धावूं नये ? त्यांना का रूपाशीं लग्न लावतां येणार नाहीं ? त्यांच्यांत कोणतं व्यंग आहे ? पण त्यांना बाह्य रूपाची ओढ नसून अंतःस्वरूपाची ओढ आहे, म्हणूनच दरिद्री व कुरूप, पण मनानें श्रीमान् असणाऱ्या माझ्याकडे त्यांचे अंतश्चक्षु वळले. एका अंतःकरणाची साक्ष दुसऱ्या अंतःकरणाला पटेल, तोच संसार सुखाचा होईल; असं मला निश्चित वाटतं.

बाह्य स्वरूपाला भुलून मांडलेल्या संसारांत, दर्शनी एक सूर भासला, तरी त्यांत स्त्री-पुरुषांच्या दुःखांचे हजारों सूर दबलेले असतात. एकीकडे स्त्री घरांत झुरत असते आणि परुषाच्या अंतःकरणाचा षड्ज दुसऱ्याच तारेशीं मिळत असतो.

माझे हे विचार कुणाला बेफाम वाटतील. ते स्वार्थांध व प्रेमांध स्त्रीचे बाष्कळपणें तोडलेले तारे वाटतील. वाटूं दे. मी म्हणतें माझ्या विवाहाकरितां समाज दूषणें देत असेल, तर मी त्याला मानायला तयार नाहीं. कारण समाज कोडीं घालतो, पण उलगडूं शकत नाहीं. ज्या समाजसुधारकांना अंतःकरणाचा जिव्हाळा नाहीं, किंवा अंतःकरणाचीं बिकट कोडीं उमगत नाहींत व सोडवतां येत नाहींत, त्यांनीं नीति, सत्, असत् यांवर खुशाल रूक्षपणें लेखण्या झिजवाव्या. त्यांच्या भूषणांची वा दूषणांची मला तितकीच पर्वा आहे.

माझा प्रश्न आईला सोडवतां येत नाहीं; नानाला सोडवतां येत नाहीं; समाजालाहि येत नाहीं. मग ज्यांनीं माझं कोडं सोडवलं, ज्यांनीं माझं सुख माझ्या हातीं दिलं, त्यांच्यासाठीं समाजाच्या क्रोधवन्हींत मी माझी आहुति देईन. त्यांना ती मान्य असली, कीं मला भरपूर आसरा आहे.

शांते, अगदीं सगळं बोलून मी माझं मन तुझ्यापाशीं मोकळं केलं. जें मनांत आलं, जें मनांत इतके दिवस कुजलं होतं, तें सगळं तुझ्याशीं बडबडत सुटलें. तूं वेडी म्हणशील नाहीं मला ? म्हण हवी तर.

---

# अविनाश !

ताई ! वावटळींत सांपडलेलं जीर्ण पान कधीं स्वतःबद्दल विचार करतं का ? आणि लोकांना तरी त्याबद्दल विचार करतां येतो का ? त्यांना विचार करणं शक्यच नाहीं. वावटळींतील धुळीचे कण नेत्रांत गेल्यानें तेच आधीं अंध बनतात, मग कोण विचारतो त्या जीर्ण पत्राला ? पायदळीं पडून चुरून जावं–नष्ट व्हावं–हीच त्याची गत. तशीच माझी स्थिति आहे. तूं कशाला विचारतेस मला ? माझ्या आयुष्याचा, अशाच वावटळींत, काय लागायचा तो सोक्षमोक्ष लागला आहे. हें आयुष्याचं जीर्ण पत्र कुठेंहि जाऊन नडलं, तरी जगानें त्याची कशाला खरं म्हणजे चिंता करावी ?

ताई ! हें एकच का असं जीर्ण पत्र आहे ? कितीक तरी आहेत. पण त्यांची कोणाला दाद ना फिर्याद ! त्यांच्याकडे पहाण्याला दृष्टि साफ नको का ? मन निर्मळ, निर्विकार नको का ? मला उत्साहच नाहीं तुला कांहीं सांगण्याला. तुझा आग्रहच म्हणून सांगतें !

माझं लग्न झालं आहे. मी डॉक्टर आहें; ही तरी एक दुःखांत सुखाची गोष्ट असं मी समजतें; कारण त्यामुळें माझ्या उद्योगांतच चूर होऊन जाऊन, रात्रंदिवस नाहीं, तरी बराच वेळ माझीं हृदयांतलीं दुःखं मी विसरूं शकतें. आणि ताई, खरं सांगायचं, तर माझ्या हृदयांत दुःखांनीं इतकीं घरं केलीं आहेत, कीं जखमेला औषध झोंबावं, तसा सुखाचा क्षणच मला तापदायक होतो ! माझं अंतःकरण उजाड आहे. निराशेनें भेसूर झालं आहे. तें इतकं, कीं आतां अगदीं मला कशाची भीतिच वाटत नाहीं. तूं म्हणशील कीं हें असं कसं ! पण मी काय म्हणतें, हें तुला कसं कळायचं ?

दहा वर्षेपर्यंत ज्या पुरुषाला आपण मनानं वरलं व ज्यानं

आपणाला स्वीकारलं, एवढंच काय, पण ज्या पुरुषाबरोबर उभ्या आयुष्याबद्दल नाना तऱ्हांच्या सुखदुःखाचे विचार केले, त्याच्याबरोबर अखेर लग्न करितां येऊं नये, यासारखी मनाला धक्का देणारी दुसरी कोणती गोष्ट असणार ? ताई, मी डॉक्टर झालें, तेव्हां मला कित्ती कित्ती आशा होत्या ! किंबहुना माझ्या प्रेरणेनें मी डॉक्टर झालेंच नाहीं. माझ्या मनानें वरलेल्या पतीच्या-अविनाशच्या-प्रेरणेनें ( तूं दचकशील, मला पापी, भ्रष्ट म्हणशील नाहीं ? म्हण. मला त्यांतच आनंद आहे. मनानें वरलेल्या पतीला सोडून, अन्य पुरुषाशीं लग्न करून संसार थाटणारी मी खरोखर ' भ्रष्ट ' नाहीं तर काय ? ) मी डॉक्टर झालें. आमच्या आयुष्याचा नकाशा आम्ही दोघांनीं मिळून तयार केला. मी डॉक्टर झालें. माझे पति ( होय, त्यांनाच मी पति म्हणणार ! ) सायन्स घेऊन बी. एस्सी. झाले होते. ते केमिस्ट व्हावें, या उद्देशानें जर्मनीहून पीएच. डी. होऊन परत आले.

माझी महत्त्वाकांक्षा जवळ जवळ पूर्ण हात आली. सुखाचा भरलेला प्याला ओंठाशीं आला; परंतु ताई, दैवानं तो नाहीं घशाखालीं उतरूं दिला ! आमचा समसमान जोडा झाल्यावर, खरं म्हणजे आई वडलांची काय म्हणून हरकत यावी ! आमची जातच नव्हे तर पोट-जात सुद्धां एक. रूपगुणांनीं माझ्यापेक्षां ते चांगले होते. याबद्दल आईबापांचें काय पण कोणाचंहि दुमत होणं शक्य नव्हतं. या गोष्टीला संमति मिळणारच, ही माझी खात्री, म्हणून मोठ्या आशेनें पण किंचित् भीतीनें, मी आई-बाबांच्या जवळ ही गोष्ट सांगितली. इष्ट गोष्टीच्या जिव्हाळयामुळें मला थोडी भीति-किंचित् शंका वाटत होती.

पण ताई, आपली डॉक्टर मुलगी गर्भश्रीमंताचे घरीं पडावी, असा आई-बाबांचा किती दिवसांचा हेतु ! माझ्या अविनाशना साडेतीनशें रुपये पगार होता. पण ते गर्भश्रीमंत नव्हते. मूळचे ते गरीब. त्यांचे आई-बाप हयात नव्हते. त्यांनीं स्वतःच्या कष्टानें सर्व विद्या पुरी केली होती.

माझे वडील श्रीमंत होते. त्यांना गर्भश्रीमंत जांवई पाहिजे होता. विचाऱ्यांच्या सगळ्या कल्पना माझ्या सुखासाठींच होत्या, हें मला माहीत आहे. माझ्यावर त्यांचें कित्ती कित्ती प्रेम होतें ! जाणून बुजून तर नाहींच पण कल्पनेंतहि त्यांना माझं अहित पहातां आलं नसतं. पण जन्मांतच मृत्यु असतो ! सुखांतच दुःख असतें. हिरकणींतच विष असतें. हें तीं विसरलीं. मला त्यांनीं नकार दिला. माझ्या मनाची, माझ्या निराशेची त्यांना कल्पनाहि नव्हती !

त्या माझ्या विचारांचें मी वर्णन करूं शकत नाहीं. माझ्या मनाला धक्का बसला. माझ्या पतींना मीं हें सर्व सांगितलं ! अविनाशांनीं तें सर्व कांहीं ऐकलं. विचारमूढ होऊन, बराच वेळ ते कांहीं बोलले नाहींत. शेवटीं कृतनिश्चयानें माझा हात धरून ते म्हणाले, "नाहीं ! तूं माझी आहेस. तूं दुसऱ्याची होणं शक्य नाहीं. !" त्यावेळीं त्यांच्या चेहऱ्यावर उठलेले भाव मी वर्णन करूं शकत नाहीं. त्यांच्या त्या निर्वाणीच्या शद्बांनीं माझ्या पोटांत भडभडून आलं !

"अविनाश ! मीहि तुमचीच आहें. मी दुसऱ्या कोणाचीहि नाहीं." एवढेच शब्द मीं उच्चारले. माझ्यांत आणखी कांहीं बोलण्याचें त्राणच उरलं नाहीं. मीं त्यांच्या खांद्यावर मान टाकून रडूं लागलें !

"तूं माझी आहेस. खरंच ना हें ?" माझा हात न कळत त्यांच्या मानेभोंवतीं वळला, आणि हृदय एकरूप झालें. निराशेनें मनोभंग झाला, तरी माझ्या हृदयाचा चिरा अभंग होता; यानें त्यांना किती तरी आनंद झाला. पण अदृष्ट पुढेंच होतं.

कांहीं दिवसांनंतर घडलेली गोष्ट. बाबा विषमज्वरानें भयंकर आजारी पडले. त्यांची अगदीं शेवटची घटकाच ती ! रविकांत नेने हेहि समाचाराला आमचे घरीं आले होते. बाबांनीं मला जवळ बोलावलें. हाय ! माझे बाबा ! मी त्यांचा जीव कीं प्राण होतें. बाबांना आतां मी अंतरणार ! कायमची अंतरणार ! माझे डोळे रडून रडून मुठीएवढे

झाले होते. आईचें दुःख मी सांगायला का पाहिजे ? बाबांनीं मला हांक मारली. " बाबा, काय हवं ? " मीं गद्गद स्वरानें म्हटलं.

ते क्षीण आवाजांत म्हणाले " बाळ नीरा ! अविनाशबरोबर लग्न करूं नको. माझी शेवटची इच्छा ! "

ताई, मी तेथेंच मरून पडलें असतें तर ? बाबांची शेवटची इच्छा ! त्या चारच शब्दांनीं, डोक्यावर वीज आदळावी, असं मला झालं. क्षणभरांत विचार केला. अविनाशबरोबर लग्न करणार नाहीं ! आजन्म तशीच राहीन माझ्या बाबांच्या इच्छेसाठीं !

" बाबा, नाहीं बरं, मी नाहीं लग्न करणार ! "

बाबांच्या चेहऱ्यावर मृत्यूची पूर्ण छाया पसरली होती. पण त्यांतही हे माझे शब्द ऐकून समाधानाची रेषा भेसूरपणें उमटली. माझ्या दुःखांतही बाबांची इच्छा पुरी केल्याचं मला समाधान होतं. त्यावेळीं बाबांचेसाठीं मी काय केलं नसतं ?

" नीरा ! "—बाबांचे ओठ हळूंच हालले.

" काय बाबा ? " मी कान त्यांचे तोंडाजवळ नेला.

" रविकर नेन्याशीं लग्न कर. वचन दे मला. म्हणजे मी सुखानें "–

कसं वर्णन करूं मी त्या प्रसंगाचं ? पोटांत धस्स झालं. सुरीनें चरचर कापल्यासारखं झालं. ' नाहीं ' कसं म्हणूं ? 'होय' तरी कसं म्हणूं ? बाबांच्या जीवाची विझती ज्योत केवळ माझ्या उत्तरासाठीं प्रज्वलित झाली होती. तिची मी निराशा कशी करूं ? बेभानपणानें मी म्हटलं, " बाबा, तुमची शपथ, मी त्यांच्याशीं लग्न करीन. बाबा, पण माझी शपथ आहे तुह्मांला, तुमच्या नीरेला सोडून तुम्हीं—"

पण मी शपथ घालण्याचे आधींच बाबांचे प्राण निघून गेले. शपथ मोडल्याचं पाप त्यांना लागलं नाहीं.

कालगतीनें बाबांच्या मृत्यूचं दुःख ओसरलं. पण अविनाश ! हाय

हाय ! मी तुह्मांला मुकलें ! आतां काय सांगूं तुह्मांला ? आणि जगूं कशी !

× × ×

'स्त्रियांचं मन पुष्पाप्रमाणें नाजुक असतं' असं म्हणतात, तें खोटं आहे. तें कट्यारीप्रमाणें पुरुषाचं हृदय चिरतं. जग उलटलं तरी पुरुष प्रिय वस्तूला कधीं झिडकारीत नाहीं; पण स्त्रिया प्रिय वस्तूंचीं खांडोळीं करतात. विश्वासघातकी पुरुष नाहींत. स्त्रियाच ! नाहीं तर, कठोर मनानें मी अविनाशना क्षणार्धांत नकार देण्याचं कसं ठरवलं असतं ? माझ्या पतींना—अविनाशना—माझ्या कठोर करणींचं कारण मी सांगितलं. ते कांहीं बोलले नाहींत. मीं मोडलेल्या शब्दाची आठवणही त्यांनीं मला दिली नाहीं.

अविनाशांचें हृदय व माझ्या सुखाचे मनोरे मी क्षणार्धांत धुळीला मिळविले. पण अविनाशनीं मला छेडलं नाहीं. दुखवलं नाहीं. शपथ घातली नाहीं. त्यांच्या या उदात्त आचरणानें माझाच कठोरपणा विरून गेला. विकल हृदयानें मीं त्यांच्या खांद्यावर मान टाकली. त्यांनीं मला हृदयाशीं धरून आमच्या दिव्य प्रेमावर मोहोर केली. तो पहिलाच व शेवटचाच पवित्र प्रेमाचा क्षण. तो क्षण मी कसा विसरेन ? तो आजही, स्मरणांतसुद्धां मला पहिल्याइतकाच सुखमय वाटतो. त्या क्षणीं आम्हीं जग विसरलों. हवेंत तरंगूं लागलों. सत्य सृष्टीचा विसर पडला. पण एकच क्षण तो. तो गेला. निःशब्दपणें आम्ही एकमेकांच्या बाहुपाशांत होतों; पण एकमेकांच्या मरणाइतक्या दुःखानें आम्ही रडत होतों. कसं सांत्वन करणार ? व कुणी कुणाचं सांत्वन करायचं ?

शेवटीं अविनाश म्हणाले—"नीरा जा. तुला हवें त्याच्याशीं लग्न कर. मला विषाद वाटणार नाहीं. तूं माझीच आहेस व माझीच राहशील. मीहि तुझाच आहें न् सदैव तुझाच राहीन."

अविनाश झटकन् निघून गेले. मी जवळजवळ वेडी बनलें.

अविनाश !

आज पांच वर्षांत आम्ही एकमेकांना दृष्टीनें अगर पत्रानेंहि भेटलों नाहीं.

बाबांच्या इच्छेप्रमाणें माझं लग्न रविकांत नेन्यांशीं, एका गर्भश्रीमंत सरकारी नोकराशीं झालं आहे. त्यालाहि आज पांच वर्षं झालीं. माझी प्रॅक्टिस व त्यांची नोकरी यांनीं आम्ही जेवढा वेळ दूर असतों, तेवढाच वेळ काय तो मला आनंदाचा ! माझे अविनाश ! ते माझेच ! मी त्यांना विसरूं शकत नाहीं. जगांत वैवाहिक सुखाचे जे क्षण त्या प्रसंगींहि मला अविनाशांचं विस्मरण होत नाहीं. रविकांतांचा पहिला स्पर्श परपुरुषासारखा वाटून मी भीतीनें ओरडलें, बेशुद्ध झालें. त्यांना विस्मय वाटला. त्यांचा विरस झाला. तें भय माझ्या मनांत कायम घर करून आहे. मी भितें, बावरतें, प्रत्येक क्षणीं व्यभिचाराच्या जाणीवेनें काळवंडून जातें. यापेक्षां काय बोलूं ?

असो. दिवसांमागें दिवस जात आहेत. जगाच्या दृष्टीनें संसार चालला आहे. ' माझा संसार ' केव्हांच नष्ट झाला आहे. मला संसार नाहीं. तो माझा नाहीं. मला एक मुलगा झाला आहे. त्याचा तोंडवळा त्याच्या पित्यासारखा आहे. मला अजून एकदांहि प्रेमानें त्याचा गोड पापा घ्यावासा वाटला नाहीं. मातेचं कर्तव्य म्हणून सर्व चाललं आहे.

ताई, कळलं ? जगाच्या दृष्टीनें सुखांत लोळणारी गर्भश्रीमंताची पत्नी पाहिलीस ? जगाच्या डोळयांत धूळ फेंकून ' पवित्र ' म्हणून मिरविणाऱ्या या कलंकितेची कहाणी ऐकलीस ? आणि माझा अविनाश ! त्यानें मात्र कायावाचामनानें अजून पावित्र्य राखलं आहे !

बाबा ! तुमची शपथ मी मोडली नाहीं. तुमच्या मुलीचा हा उजाड संसार तुम्हांला दुःख देत असेल नाहीं ? तुमच्या उत्कट पितृप्रेमामुळें रविकांतांशीं तुम्हीं माझी गांठ घातलीत ! पण बाबा, पदरांच्या गांठी बांधल्या तरी मनाच्या गांठी बसत नाहींत ! अंतःकरणाची गांठ तीच खरी.

---

# प्रेम हें विष का अमृत ?

मी अगदीं आश्चर्यानें स्तंभितच झालें ! जी गोष्ट माझ्या ध्यानीं, मनीं अगर स्वप्नींही नव्हती, ती माझ्या बाबतींत लोक बोलूं लागले ! असं लोक म्हणतात तरी कशावरून ? मीं खूप विचार केला. अरुणाच्या आणि माझ्या वागणुकींत असं काय लोकांना दिसलं ? हें मीं पुनः पुनः आठवूं लागलें. लोकांनीं असा विक्षिप्त निष्कर्ष काढण्यासारखं मला कांहीं आठवेना ! मी मैत्रिणींजवळ चौकशी केली.

कॉलेजच्या जिन्यावरून म्हणे, एकापाठोपाठ चढतांना आम्हांला कित्येकांनीं पाहिलं. कमाल आहे बाई ! आम्ही चोरून का चढत होतों ! आणखी कितीक जण आमच्याबरोबर सहजासहजीं जिन्यावर मागें पुढें असतील कीं ! मग त्या सर्वांशींच माझं लग्न कां नाहीं लावलं ? अशी कशी लोकांची दृष्टि बनते ? काय म्हणे, अरुण आणि मी एकमेकांच्या घरीं जातों. एकमेकांशीं बोलतों ! पण मी तरी नाहीं कुठें म्हणतें ? मला गंमत वाटते ती इतकीच, कीं अरुण आमच्या घरीं आला, तर माझ्याजवळ बोलतो, तसाच तो दादाशीं, आईशीं नि बाबांशींही बोलतो. लोकांना तेवढं मात्र कां दिसत नाहीं ? मी बोलतें तेवढंच कसं दिसतं ? मी सुद्धां त्याच्या घरीं जातें, तेव्हां त्याच्यासारखीच त्याच्या घरच्या माणसांजवळ बोलतें. पण लोकांना तरी भुतं उठवून आपल्या मनाची आवड भागवायची कोण हौस ही ! मी सोलापुरला बहिणीकडे गेलें तेव्हांच अरुण लोणावळ्याला का कुठेंसा गेला होता. लोकांनीं लागलंच उठवलं. "गेलीं मजा करायला !"

या खोट्या आभासाचीं पुटं लोकांनीं इतकीं कांहीं चढवलीं होतीं, कीं तीं पाहून संतापानें मला वेड लागायची पाळी आली होती.

पण हा नियमच आहे, कीं निरपराधी मनुष्य खोट्या आरोपामुळें गांगरला तरी कांहीं लोक म्हणतातच, कीं तो गांगरला, त्याअर्थी तो अपराधीच आहे. बरं, न सांगतां थिमा राहिला, तरी म्हणणार बेरड आहे म्हणून ! तेव्हां करायचं काय ?

'निराधार लोकप्रवाद उठतच नाहींत,' असा कोणी दुराग्रह धरून बसेल, तर मला कबूल केलं पाहिजे, कीं अरुणच्या व आमच्या कुटुंबांचा घरोबा होता. कुटुंबांतील सगळींच माणसें सगळयांच्याच ओळखीचीं. त्यांत लपवाछपवी, वांकडेपणा, आडपडदा असें कांहीं एक नव्हतं. माझी व अरुणची ओळखही याच तऱ्हेची. पण त्यांतून लोकांनीं उठवलेले प्रवाद ऐकले म्हणजे मात्र हंसावं, रडावं, जगाची कींव करावी कीं स्वतःची करावी हें कळत नाहींसं झालं होतं.

लोकप्रवादांना बळी पडणारं माझं मन दुबळं आहे, असं म्हणून लोक माझा उपहास करतील, हें मला माहीत आहे. पण त्यानें निरर्गल बडबडणाऱ्या जगाचा नीचपणा कमी होतो, असें मात्र नाहीं. झंझावातानें कितीक वृक्ष समूळ हालतात; कितीक कडाडून मोडून पडतात. तसाच प्रकार येथेंही आहे. थिम्या वृत्तीला लोकापवादानें त्रास होत नाहीं असं नाहीं. दुबळया मनाची विकलता तेथें दिसणार नाहीं एवढेंच ! निश्चयी मनाला सुद्धां डळमळायला लोकप्रवादाची झुळूक कारण होते. महान् वृक्षही वाऱ्याच्या झुळुकेचा मस्तक हलवून प्रतिकार करतात. सामान्य माणसाची प्रतिकार करणें ही सहजप्रवृत्तिच आहे. आपला स्वतःचा दोष असतांही कित्येक मनुष्यें खोटेपणानें प्रतिकार करतात. त्यामुळें खऱ्याची किंमत जगांत राहिलेली नाहीं. दोष नसल्यामुळें कोणी प्रतिकार केला, तरी जग त्यावर विश्वास ठेवीत नाहीं. अशा वेळीं दुर्बल मनाची अवस्था मोठी कठीण होते, लोक आपल्यावर विश्वास ठेवीत नाहींत, म्हणून निराशेनें व वैतागानें मनुष्य त्या

दोषाचाच अंगिकार करतो. मग तर काय ! लोकांना आपलें म्हणणें खरें झाल्याचा आसुरी आनंद उपभोगायला मिळतो ! या ठिकाणीं नसता दोष अंगीं भिडवण्याला जगाचा नीचपणाच कारण नसतो काय ? बाकी केवळ जगाला तरी दोष कां द्यावा ? स्वतःच्या दुबळ्या प्रवृत्तींचाही तो दोष आहेच.

अरुणाची व माझी मैत्री होती. या पलीकडे कोणतीच भावना आमच्या मनांतच आलीं नव्हती. पण स्त्री-पुरुषांची निष्काम मैत्री संभवनीय आहे, असं लोकांना वाटत नाहीं, त्याला काय करणार ? स्त्री-पुरुषांच्या मैत्रीकडे कावीळ झालेल्या दृष्टीनेंच पहाण्याची लोकांना संवय झालेली असते. सबंध कुटुंबांत घरोबा असला तरी, त्यांत लोकांना आमची दोघांची ओळखच उठून कां दिसावी ? याला उत्तर म्हणून कोणी म्हणेल, तुमच्या वागण्यांतच तसं कांहीं असेल. पण माझ्या मनाच्या साक्षीनें मी सांगतें, कीं आमच्या वागण्यांत अतिशय असा कोठेंच नव्हता. तो लोकांना वाटत होता एवढंच. आमच्या घराच्या दाराशीं सायकल् असली, कीं ती अरुणाचीच सायकल् असली पाहिजे आणि अरुणसुद्धां माझ्याशींच बोलत असला पाहिजे, हे हवेंतले तर्क लोकांनीं कोणत्या आधारावर काढले ? केवळ आम्हीं दोघें बरोबरीचीं व अविवाहित, तेव्हां संभाव्य गोष्ट म्हणूनच लोक तर्क करीत होते एवढेंच.

अरुण आमच्या घरीं आला किंवा मी अरुणाकडे गेलें, कीं लोकांची शोधक दृष्टि लगेच टंवकारून पाहूं लागे. रिकामटेकड्या बायका विनाकारण कामाचं निमित्त सांगून कोण कोठें बसलं आहे, हें पाहून जात आणि आश्चर्याची गोष्ट अशी, कीं पंचवीस माणसांत अरुण नि मी बसलों असलों तरी रिकामटेकड्यांना अरुण नि मीच दिसत असूं. बाकीचीं माणसें दिसत नसत. अशु दृष्टीचे अनेक नमुने असले, तरी हा नमुना कांहीं विचित्रच खरा.

ज्या रस्त्यानें अरुण दोन मिनिटांपूर्वीं गेला, त्या वाटेनें मी गेलें, कीं हीं दोघं बरोबर गेलीं, एकाच ठिकाणीं गेलीं, वगैरे तर्क उठलेच. आणि त्या तर्कालाच लोकांनीं सत्याचं स्वरूप दिलं. कॉलेजच्या जिन्यावरून अनेक मुलं जात असत. पण मुलांना आम्ही दोघंच दिसावीं व आम्ही सहेतुकपणेंच एका वेळीं जात आहों असं वाटावं, हा चमत्कार नाहीं तर काय ? अरुणाकडे सरळ मोकळेपणानं टाकलेल्या दृष्टींतही लोकांना कातरपणा व लाजाळूपणा दिसावा, म्हणजे आश्चर्यच नाहीं का ? रंग भरावा तसा दिसतो. सत्याच्या पुराव्यापेक्षां बाह्य परिस्थितीचा पुरावाच कित्येक वेळां श्रेष्ठ मानला जातो. म्हणून आमच्या बाह्य वागणुकींतील मोकळेपणाचा पुरावा धरून लोकांनीं आमचा विवाह लावून टाकला.

भावावर प्रेम असतं, पण त्याच्यासाठीं विशेष प्रकारची हुरहुर लागत नाहीं. त्याच्या सान्निध्याची, स्पर्शाची व दृष्टीची भूक लागत नाहीं. भाऊबहीण भेटलीं तर त्यांच्यांत एक प्रकारचा मोकळेपणा असतो. चोरटेपणाचा वासही त्या प्रेमांत नसतो. अगदीं तशीच स्थिति माझ्या व अरुणाच्या मैत्रीची होती. त्यांत आम्हांला अगर आमच्या दोघांच्या घरांतील माणसांनाही कधीं निराळेपणा वाटला नाहीं. पण आमच्या मैत्रीचा विपरीत अर्थ ज्या दिवशीं लोकांनीं केला, त्या दिवशींच मला वाटतं, आमच्या मैत्रीला दृष्ट लागली.

अरुण कांहीं झालं तरी पुरुष होता. त्याला लोकांच्या वृत्तीची चीड आली, तरी तिचं स्वरूप माझ्यापेक्षां किती तरी धीर गंभीर होतं. मला मात्र चैन पडेना. मी रडलें. लोकांना हवीं तितकीं नांवं ठेवलीं. आईबापांनीं माझं हरतऱ्हेनें समाधान केलं. 'लोकांच्या तोंडाला कुणी हात लावायचा ?' असं म्हणून समजूत काढली. पण माझ्यावर केलेला खोटा आरोप नाहींसा करण्यासाठीं मीं वाटेल तें करायचा निश्चय केला. मी या सर्वांचं मूळ कोण, तें शोधूं लागलें पण ऋषींचं कूळ नि नदीचं मूळ पहाण्यापेक्षांही, लोकापवादाचं मूळ पाहूं

जाणं चुकीचं ठरतं. जो तो दुसऱ्यावर दोष ढकलून आपण नामानिराळा होतो. शिवाय आपल्या मूळ शोधण्याच्या प्रयत्नानें त्या लोकापवादाला अधिक फांटे फुटून, तो सैरावैरा वाढत जातो. आतां सुचलं, तरी पण हें तत्त्वज्ञान त्यावेळीं मला पटणारं नव्हतं. मीं हरतऱ्हेनें मुळाशीं हात घालून त्याचा नायनाट करण्याचा निश्चय केला. पण स्थिति उलट होऊं लागली. "ज्याअर्थीं ही इतकी चिडते, त्याअर्थीं कांहीं तरी पाणी मुरत असलं पाहिजे" असं कित्येकांना वाटूं लागलं व तसं ते इतरांजवळ बोलूं लागले. तें माझ्याही कानावर आल्यानें मी अधिकाधिक चिडून वैतागून गेलें. आरोपाचें निराकरण, हाच एक माझा चिंतनाचा व्यवसाय होऊन बसला. अरुण नि मी, अरुणाची व माझी मैत्री, आमच्याबद्दल उठलेली वदंता, यांसंबंधीं डोक्यांत सारखे विचार चालूं लागले. अरुणाचं व माझं यावर मोकळेपणीं बोलणं होई. आम्हां दोघांचाही लोकांवर तीव्र रोष होता. दोन्हीं घरचीं माणसं जमलीं, म्हणजे आमचा हा एक विषय निघायचाच ! व सर्वांनाच हें अशक्य व असंभाव्य वाटत होतं. अशा स्थितींत कित्येक दिवस गेले. घरचीं माणसें त्या जुन्या विषयावर बोलेनाशींसुद्धां झालीं. एवढंच काय, पण अरुणाच्या लग्नाची वाटाघाट अलीकडे बरेच दिवस चालली होती, तशीच ती चालू राहिली. घरच्या मंडळींनीं आम्हां दोघांच्या विवाहाचा विचारही मनांत आणला नाहीं. पण या विचारांच्या कोलाहलांत माझ्या मनानें या गोष्टीची संभाव्यता, असंभाव्यता नीट पारखण्याचा प्रयत्न अनेकवार केला. मला वाटतं, अरुणानेंही तसा प्रयत्न केला असेल; पण त्या संभाव्यतेबद्दल आम्हीं कधींही शब्दसुद्धां एकमेकांत उच्चारला नाहीं.

मनांत एकदां विचार आला व त्याला फोंफावण्याला अनुकूल परिस्थिति असली, कीं अशक्य गोष्टीसुद्धां शक्य कोटींत येऊन बसतात. पूर्वीं आम्ही दोघंच एकाद्या खोलींत असलों, तरी मला चोरटे-

पणा कधींच वाटला नव्हता. अलिकडे कां कोण जाणे, अशा वेळीं गांगरल्यासारखं होई. आम्ही खुल्या मनानें पूर्वी जवळ बसत होतों. आतां जवळ बसण्यास मला संकोच वाटे. आमच्या दोघांच्याही वृत्तींत फरक पडत होता खास. त्या फरकाची माझी मलाच भीति वाटत होती, हेंही तितकंच खरं.

माझ्या मनांत लोकापवादानें जो कल्लोळ उठवला होता, त्यांत मला कल्पना नव्हती असे विचार रुजले. तसेच अरुणच्याही त्या वेळीं रुजले असतील का? कांहीं असो. आम्ही लोकांच्या देखत तर बोलणं वगैरे टाळीत होतोंच; पण एरवींसुद्धां आम्हांला संकोच वाटूं लागला होता.

माझं एक मन म्हणे, त्यांत काय मोठंसं? तुमचं लग्न झालं, तरी तुमचं कुलशील समान आहे. सर्व कांहीं छान आहे. समजा, लोकापवादानें मैत्रीला असलं स्वरूप आलं असलं, तरी त्यांत बिघडलं कुठें? लग्न करायची भीति कशाला? लोक म्हणतील, "कां? आम्ही जेव्हां म्हणत होतों तेव्हां नाकानें कांदे सोलले नि आतां झालंच ना खरं आमचं?"

पण त्यांत काय आहे? म्हटलं लोकांनीं तर म्हटलं. लग्नच करणार; त्यांत वाईट काय आहे? असा विचार मनांत येई.

पण लगेच आंतील स्वाभिमानी मन म्हणे, "छेः, ज्या लोकांचा तूं खोट्या आरोपाबद्दल व दूषित दृष्टीबद्दल धिक्कार केलास, तीच तूं गरीब गाय होऊन त्यांना शरण जाणं केव्हांही बरोबर व्हायचं नाहीं. लोकांचं तर बाजूलाच राहो. पण अरुणाजवळसुद्धां मी अशी कांहीं बडबडलें होतें, अन् तोही असं कांहीं बोलला होता, कीं आतां नवीन उत्पन्न झालेल्या भावना एकमेकांजवळ बोलून दाखवण्याला मन कचरत होतं. पण तेंच कचरणारं मन, आंतल्या आंत विवाहाची अनुरूपता नजरेस आणीत

होतं. मनानें रूप, जात, वय, विद्या सगळं कांहीं जुळत होतं. जरासंधाच्या देहाचे दोन तुकडे दूर फेकले, तरी जवळ येऊन ते सांधत होते. विवाहाची अनुरूपता दाखवणाऱ्या माझ्या मनाचं तसंच झालं होतं. तें मन मी चिरून दोन तुकडे दूर भिरकावून द्यावे. पण ते दोन तुकडे पुनः एक होत नि अरुणाबद्दल विचार करूं लागत. अरुणाचंही असंच होत होतं का ? पण तें मला कसं कळणार ? आम्हीं त्याबद्दल कधीं बोललोंच नाहीं.

सगळ्यांत दैवाचा खेळ—मग तो चांगल्यासाठीं होता, कीं वाईटासाठीं कोण जाणे—तो असा, कीं अरुणाचं दुसऱ्या मुलीशीं लग्न ठरलं सुद्धां. आणि आमचे एकमेकांसंबंधीं विचार जागच्या जागींच राहिले.

अरुणाचें लग्न झाल्यानें एकीकडे मनाच्या कोठल्याशा कोपऱ्यांत वेदना झाल्या खऱ्या; पण त्याबरोबर समाधानाचा निःश्वासही निघाला. अरुणाशीं मी बरेच दिवसांत मोकळेपणानें बोलल नव्हतें. आतां मात्र त्याची अगदीं मनमुराद थट्टा केली. त्यानेंही थट्टा करून घेतली. पण कधीं कधीं तो असा कांहीं शून्य मनानें पाही, कीं मला तें एक गूढच वाटे; एवढेंच नव्हे, तर असाही विचार मनांत येई, कीं माझ्या मनांत जशी खळबळ होत होती, तशीच थोडी फार याच्या मनांत होत असेल. पण हा विचार मी धुडकावून देत असें. आणि कधीं कधीं मात्र त्याला मी म्हणे, 'अरुण, असं रे काय करतोस ? मध्येंच अगदीं गंभीर होतोस. मध्येंच शून्य दृष्टीनें पहातोस ? इतका का अगदीं वहिनीसाठीं रुखरुख लावून घेतोस ?' तो भेदक दृष्टीनें क्षणभर पाही, व लगेच म्हणे, "उषे, अगदीं निष्ठुर आहेस तूं. किती थट्टा करतेस ? आणि आतां ती गोष्ट अगदीं शिळी झाली आहे. तेव्हां नेहमीं तरी त्यांत नवेपणाची गंमत मला कशी वाटणार ?" त्याच्या 'निष्ठुर' शब्दाचं स्पष्टीकरण मीं त्याला विचारलं नाहीं. मात्र त्याच्या हृदयांत कांहीं तरी शल्य असावं, असं

मला वाटलं. अरुणच्या लग्नांत मी खऱ्या समाधानानें व त्याचं म्हणजे अगदीं माझ्या भावाचंच लग्न, अशा भावनेनें व उत्साहानें वावरलें.

अरुणच्या लग्नामुळें माझ्या मनांत उद्भवलेल्या अस्पष्ट विचारांना बांध बसला व मला एक प्रकारें आनंद झाला. लोकांना आतां आमची मैत्री शुद्ध स्वरूपाची होती हें पटेल, अशी मला खात्री वाटली. अरुणची बायको सर्व दृष्टीनें चांगली मुलगी होती. तिची नि माझी चांगलीच मैत्री झाली. वहिनी–वन्संचं चांगलंच रहस्य चालत असे. अरुणशीं माझी मैत्रीही पूर्वीसारखीच राहिली. आमच्याविषयीं उठलेल्या काहुराबद्दल आम्ही क्वचित् बोलत असूं, त्यावेळीं अरुण एकदम विमनस्क होई; कधीं शून्य दृष्टीनें पाहूं लागे. मला राहून राहून हें गूढ वाटे.

एवढंच नव्हे, तर अरुणाच्या लग्नापूर्वीं माझ्या मनांत जे विचार आले, तसेच विचार अजूनही याच्या मनांत येत नसतील ना ? असं माझ्या मनांत येई. पण त्या विचाराची सुद्धां मला भीति वाटे. माझी त्या दोघांशींही मैत्री होती व ती वाढतच होती. वहिनीला मीं फार आवडत असें; एवढंच नाहीं, तर अरुणाबद्दल व त्याच्या स्वभावाबद्दल ती माझ्याशीं मनमोकळेपणानें बोले. मी तिला माझी धाकटी बहीण समजून तिच्या विश्वासाची वांटेकरीण झालें होतें. आतां या मैत्रीला दृष्ट लागण्याचा संभव नाहीं असं मला वाटत होतं.

देवळांतील कांहीं बायकांत, कॉलेजांतील कांहीं मुलांत, एवढंच नव्हे, तर कांहीं लोकांतही अशी वदंता असलेली माझ्या कानावर आली कीं "वहिनीच्या भोळया जीवाला कळत नाहीं, पण मी तिच्या आयुष्याची माती करणार !"

लोकांना माझी आणि सुधेची–अरुणाच्या बायकोची–मैत्री दिसत नसून पुनः माझी व अरुणाची दिसूं लागली ! ! मला हें कळलं, त्या दिवशीं माझी फार चमत्कारिक अवस्था झाली. त्यानंतर मीं अरुणाकडे जाणं अजीबात सोडलं. सुधेनच मला ओढून नेण्याचा

प्रयत्न करावा; पण मी तिच्या घरीं जाण्याऐवजीं माझ्या घरींच तिला बसवून घ्यावं, असं सुरूं झालं.

सुधा मला नेहमीं म्हणे वन्सं, तुम्ही येत नाहीं आतां पहिल्यासारख्या. तुम्ही रागावलां आहांत माझ्यावर आणि इकडच्यावर." मी तिला काय सांगणार ? तिच्या मनाला कशाला उगीच कीड लावायची ? मा हंसूनच ती गोष्ट उडवून देई. एकदां सुधा म्हणाली, 'वन्सं, तुम्ही पण माझ्यावर रागावलां आणि हे पण अलिकड शून्यमनानें सारखे विचार करीत बसतात. त्यांचं कशांत सुद्धां लक्ष नसतं. मला अगदीं चैन पडत नाहीं." वहिनीच्या बोलण्याचा अर्थ मला कळला. माझा चेहेराही पालटलेला तिला दिसला असेल. पण तिला माझी भीति कळणं शक्य नव्हतं. ती मला म्हणाली, " वन्सं, असं काय झालंय् अलीकडे. मला उगीचच हुरहुर लागल्यासारखी वाटते."

तिच्या हुरहुरीचा अर्थ मला कळत होता. भयंकर भविष्याचं तें पूर्वचिन्ह तर नसेल ? कारण मलाही हुरहुर लागली होती. अरुणालाही लागली असावी. कांहीं दिवसांनंतर घडलेली गोष्ट. अरुण आजारी पडला. मी त्याला भेटायला गेलें. अरुणचं नि माझं नव्या वदंतेबद्दल स्पष्टपणें बोलणं झालं. आम्हांला आमचीं कींव आली. असह्य विचारांनीं अरुणचं शरीर कमकुवत झालं होतं. आम्ही पुष्कळ बोललों. शेवटीं दोघांच्या विवेकामुळें आम्ही एकमेकांपासून दूर जायचं नि एकमेकांना विसरण्याचं ठरवलं. अरुणच्या लग्नापूर्वींच लोकवदंतेनें निर्माण झालेल्या अस्पष्ट विचारांनीं अरुणच्या मनावर ठाणं दिलं होतं. पण त्यानं तिकडे लक्ष दिलं नाहीं. ते विचार मूर्त स्वरूप घेऊन त्याला भेडसावूं लागले. पण केव्हां ? त्याच्यालग्नानंतर ! सुधेबद्दल त्याला करुणा येई. ती त्याला सर्वगुणसंपन्न वाटे. पण त्याला तिच्याबद्दल ती पत्नीविषयक भावना

निर्माण होईना. अरुणाची असहाय स्थिति झाली होती. पण तो विवेकी होता. त्यानें कर्तव्य म्हणून सुधेला हरतऱ्हेनें सुखी करण्याचा प्रयत्न चालविला होता. पण मन ? तें जिवंत नसतं, तर बरं झालं असतं !

अरुणानें मजजवळ हें सांगितलं नसतं, तरीही मला अंतर्ज्ञानानें तसं वाटत होतं. माझीही उंच ठिकाणाहून घसरणाऱ्या माणसासारखी स्थिति होत होती. मी आणि अरुण एकमेकांपासून दूर गेलों. आम्हां दोघांच्या हितासाठीं व अल्लड, निरपराधी सुधेसाठीं आम्ही दूर गेलों.

बरेच दिवसांनीं अरुणचं एक पत्र मला आलं. एकमेकांपासून दूर जाण्याचा अत्यंत वाईट परिणाम त्याच्यावर झाला होता. त्याचं शरीर व मन दोन्हीही खंगत चाललीं होतीं. आणि माझं ? त्या पत्रानें माझं मन अधिकच विदीर्ण झालं.

आम्ही एकमेकांपासून दूर गेल्यावर मनाची खिन्नता–खिन्नता म्हणण्यापेक्षां मनस्ताप विसरण्यासाठीं मीं कित्येक दिवसांत मुळींच विश्रांति घेतली नाहीं, सबंध दिवसभर कांहीं ना कांहीं उद्योगांत राहिलें, कीं मनाला स्वत:संबंधीं विचार करायला सवड तरी केव्हां मिळणार ? आणि सबंध दिवस कष्ट करीत राहिलं, कीं झोंपेंतही तितकासा व्यत्यय येत नाहीं. अशा रीतीनें दिवसरात्र हीं मी अगदीं बांधून टाकलीं होतीं.

दुपारच्या वेळीं मी जरा स्वस्थ असलें किंवा संध्याकाळीं एकटी फिरायला गेलें, कीं दडपून टाकलेले विचार क्षुब्ध होऊन सैरावैरा मनाच्या कानाकोंपऱ्यांतून धांवत येत आणि एकट्याच सांपडलेल्या माझ्यावर हल्ला करीत. त्यावेळीं माझं मन अगदीं विकल होऊन जाई. एक प्रकारचा असा कांहीं विलक्षण शीण येई, कीं ज्या दगडावर अगर हिरवळीवर मी विचार करीत बसें, तेथून उठण्याचं त्राणसुद्धां माझ्यांत उरत नसे. डोकं भणभणूं लागे. मला वेड लागेल–नव्हे लागलं आहे असं वाटे. अंधारांत एकटं जायची

लहानपणीं मला भीति वाटे. मोठेपणीं विचारांच्या क्षोभांत एकटीनें सांपडायची मला भीति वाटे. तरी पण कितीक वेळा अशाच असत, कीं नको आतां हें जग नि हीं सभोंवतीं वावरणारीं माणसं ! एकटं एकटं दूर दूर कुठें तरी जावं आणि विचारांच्या भक्ष्यस्थानीं डोकं फुटेपर्यंत पडावंसं वाटे. अशा वेळीं मी जगावर, मानवी निर्बंधांवर तर रागावलेली असेंच, पण माझ्या स्वतःवरही मी रागावत असें. माझा मलाच तिरस्कार येऊं लागे. माझी मलाच मी क्षणांत दुष्ट वाटे, क्षणांत हतभागिनी वाटे, कधीं अक्कलशून्य वाटे, कधीं शहाण्याला जगांत जागा नाहीं असं वाटे. एक ना दोन ! हजार तऱ्हांनीं हजार तऱ्हांचे विचार येत. भविष्यकाळ शून्य, ओसाड वाटूं लागे. पुनः वाटे, इतका काय अगदीं आपण राईचा पर्वत करतों आहों.

जगांत जिव्हाळ्याशिवाय जगतां येणं शक्य नाहीं. अगदीं खरं. मग मला प्रेमळ आई नव्हती काय ? चार वेळां खायला प्यायला घालून मला फुलासारखी ती वागवीत नव्हती काय ? मग मला आणखी जिव्हाळा तरी कसला हवा होता ? बरं, खाण्यापिण्यापलिकडे माझी आत्मिक उन्नति. तर तिच्यासाठीं माझे वडील काय वाटेल तें करीत होते. माझ्या उन्नतीच्या आड ते कोणत्याच तऱ्हेनें येत नव्हते. तेव्हां मायेचा अंध जिव्हाळा आणि पित्याचा डोळस जिव्हाळा असतांना मला सुख तरी कोणतं खुपत होतं ? अशी काय मी कांटेरी अंथरुणावर पडलें होतें ? पण नव्हतें हें जितकं खरं, तितकीच होतें, हेंही खरं.

मायेचा अंध जिव्हाळा होता. वडलांचा डोळस जिव्हाळा होता. पण अंध आणि डोळस दोन्ही तऱ्हेचा जिव्हाळा एकत्र झालेला असा मला लाभला नव्हता. त्यासाठींच माझी रुखरुख होती. केवड्याचा सुगंध उपभोगायला नागिणीचं भय आडवं येतं. गौरीशंकर गांठायला हिमानें गोठण्याची भीति असते. माझ्या मनाला हवा असलेला जिव्हाळा मिळायला मला जनतेच्या विषारी फूत्कारांची भीति वाटे. लोकांच्या

औदासीन्यानें केलेल्या टीकेनें गोठून जायची मला भीति वाटत होती. हजार वेळां मनांत येई, कीं नकोच तो विचार. भविष्यकाळांत जें होईल तें होईल. नको ते लोकांचे विषारी फूत्कार आणि तें जगाचें औदासींन्य. मला माझ्या विवेकाची जेवढी भीति तेवढीच लोकांच्या बहिष्काराची भीति वाटत होती. माझ्या सुखासाठीं मी वाटेल तें करीन, असे बंडखोर विचार मनांत आले, तरी दुसऱ्याच क्षणीं वाटे, कीं जगाविरहित, जगाला झिडकारून, केवळ माझ्या–केवळ एकट्या व्यक्तीच्या सुखाची कल्पना शक्य कशी आहे ? माझं सुख आत्मनिष्ठ आहे तसंच परनिष्ठ आहे. सुखाला दोन बाजू आहेत. माझ्या आत्मनिष्ठ सुखासाठीं मी लोकांची क्षणभर पर्वा करणार नाहीं. पण मला जोंपर्यंत जगांतच जगायचं आहे, माणसांतच राह्यचं आहे, त्यांच्याही जिव्हाळ्याची भूक आहे, तोंपर्यंत मला केव्हां ना केव्हां माझी बेपर्वाई नडणारच. माझं आत्मनिष्ठ सुख मिळाल्यावर तें परनिष्ठ सुखाच्या कोशांत जर मला ठेवतां आलं नाहीं, तर जळावांचून तडफडणाऱ्या माशासारखी स्थिति माझी होईल. मग करूं काय ? जगाची पर्वा करून माझा जीव सुकवूं कीं जगावर लाथ मारून माझा जीव फुलवूं ? दोन्ही गोष्टींत मला कालांतरानें सुख लागणार नाहीं असं वाटे. हें कोडं उलगडत नसलं, तरी स्वतःच्या सुखासाठीं धडपडणारं मन पुनः पुन्हां तें कोडं उलगडायला घेई आणि पुनः पुन्हां निराश होई. विचार खुंटले तरी ते समूळ नष्ट होत नव्हते. विचार करायचा नाहीं म्हणून विचार जर थांबते, तर किती बहार झाली असती ! पण विहिरींत उडी झोंकल्यावर अर्ध्या वाटेंतून परत फिरतां येतं का ? शक्यच नाहीं. पाण्यांत हें पडलं पाहिजेच. मग विहिरींतल्या कपाऱ्या टाळून कुशलतेनें पोहावं. पोहतां येत नसेल तर बुडून मरावं. या दोनच गोष्टी संभवतात. तसंच विचारांचं. विचारांनीं मनांत झेंप घेतली, कीं विचार करून खंगावं, नाहींतर धडाडीनें व कौशल्यानें कांहींतरी कृति

करून टाकावी. तसं झालं नाहीं तर ते विचार स्वस्थ बसूं देत नाहींत.

मला माझे विचार स्वस्थ बसूं देत नव्हते. त्यांना निकाल हवा होता. तो मिळेपर्यंत त्यांनीं मला सळो कीं पळो केलं होतं. मी खूप काम करून त्यांना धुडकाऊन देत होतें; पण त्यानें माझं शरीर खंगत चाललं. श्रमानंतर मनःस्वाथ्य कांहीं तरी पाहिजे; तें मला मुळींच नसल्यानें श्रमलल्या शरीरावर विचार निष्ठुरपणें सत्ता चालवूं लागले. दमल्या भागल्या वेळीं माझा ते सूड उडवूं लागले. मीं मरायचं ठरवलं; कारण मला कोडं सुटेना. स्टेशन घराजवळच साधारण मैलभर अंतरावर होतं. संध्याकाळीं सहा वाजतां गाडीची वेळ होती. त्याच्या आधींच स्टेशनपासून खूप दूर अंतरावर कोणाला दिसणार नाहीं अशा ठिकाणीं जाऊन गाडी दूर दिसली कीं अंग झोंकून द्यायचं मीं ठरवलं. कां कोण जाणे ! एक प्रकारें विलक्षण समाधान घरून निघतांना माझ्या मनाला वाटत होतं. " एकदांचा निकाल लागला. आतां सर्व कटकटींतून मी सुटेन " असं म्हणून समाधानाचा निःश्वास मीं टाकला. आईला, वडलांना, कुणालासुद्धां मी कांहीं कळवलं नाहीं; सांगितलं नाहीं. गर्भश्रीमंत घरांत आईबापांच्या प्रेमळ सान्निध्यांत मला दुःख काय असणार ? ही त्यांची कल्पना होती. माझ्या दुःखाचा वृक्ष केवढा वाढला होता हें त्यांना अगदीं सुद्धां माहीत नव्हतं. माझं दुःख मी स्वतःशिवाय कुणाजवळ बोलूं इच्छित नव्हतें व बोललें नव्हतें. मग आजच्या माझ्या निश्चयाबद्दल तरी त्यांना काय म्हणून सांगायचं ? माझ्या मरणानें त्यांना अतोनात दुःख होईल. पण तें दुःखसुद्धां काळ विसरायला लावील. माझ्या मरणाचं दुःख अल्पकाल टिकणारं आहे; पण मी जगाविरहित कृति केली, तर मी व तीं जिवंत असेपर्यंत त्यांना दुःख होत राहणार. तेव्हां त्यांना माझं दुःख न सांगतांच मी मरणार. या विचारानें मी घरून निघालें. स्टेशनजवळ आलें.

स्टेशनपासून दूर, कोणाला दिसणार नाहीं, अशा ठिकाणीं मला जायचं होतं. स्टेशनच्या पुढें मी चालूं लागलें, तोंच एकाएकीं कांहीं विलक्षण विचार मनांत येऊन मी चमकून गेलें.

मी कुमारिका. आगगाडीच्या रुळावर जीव दिला तर लोक काय म्हणतील ? मी कितीही नेकीनें आणि नीतीनें राहिलें असलें, नेकी-साठींच मरत असलें, तरी माझं वांकडं पाऊल पडलं म्हणून मीं जीव दिला, असंच लोक म्हणतील. या विचारानें मी अगदीं थरारून गेलें. माझ्याबद्दल लोकांना अशी शंका घेऊं देणं, हें मला कसंसंच वाटूं लागलं. सरळ निष्पाप हृदयाची कुमारिकासुद्धां हीन लोकांना डागण्या देण्याची वस्तु वाटते. तिच्याबद्दल वाटेल तें बोलावं; वाटेल ते तर्क करावे; तिच्या कौमार्याबद्दल शंका घ्यावी; असं खडतर जीवन तिला कंठावं लागतं. बरं ती मेली तरी तिला पापी, दुर्गंधि विचारांनीं लोक मूठमाती देतात. छेः मी नाहीं मरणार ! माझ्या पवित्र जीवनाला शेवटीं लोकांच्या हीन उद्गारांचा कलंक नको लागायला. पण हा विचार क्षणभरच टिकला ! लगेच मनांत आलं, कीं मेल्यावरची काळजी करणारी मी खरोखर किती स्वार्थी, भ्याड नि आपमतलबी आहें ! मी जगलें, अगदीं पावित्र्यानें जगलें, तरी सगळं जग मला पवित्र मानील असं थोडंच आहे ! त्यापेक्षां खरोखर दुसऱ्याच्या सुखाचा पेला हिसकावून घेण्याचा नीचपणा करण्यापेक्षां, मी मेलें तर त्या त्यागाचं समाधान तरी मला मरतांना मिळेल. लोकांना त्या त्यागाची कल्पना येणार नाहीं. पण कल्पना आली तरी अधिक काय होणार ? पुनः मीं मरायचं ठरवलं.

स्टेशनपासून दूर अंतरावर एका झाडाजवळ मी उभी राहिलें. अंधार पडत चालला होता. पण घरीं आई काय म्हणेल, याची एक क्षणच भीति वाटली. लगेच हंसूं आलं. कारण आतां काळजी करण्याचं कारण नव्हतं. मरायचं ठरवलं; मग त्याला आईची नि अंधाराची

भीति कशाला ? उलट अंधारांत मरायलाच सोपं जाईल. मरणाच्या दाढेंतून कोणी मला काढणार तरी नाहीं. माझ्या चिंतेनें आईवडलांना सुचत नाहींसं होईल. पण माझा शेवट त्यांना कळल्याशिवाय थोडाच राहील ! इतके विचार जरी मनांत येत होते, तरी मनुष्याचं मन किती लोभी, किती वेडं असतं ! अंगावरचे सगळे दागिने घरीं काढून ठेवले होते, तरी हातांतील बांगड्या काढल्या नव्हत्या म्हणून चुटपुट लागली होती ! आईला अमुक तमुक सांगायचं राहिलं म्हणून तळमळ लागली होती. पण ही तळमळ माझ्या मरणाच्या डंक्यांत कोठल्या कोठें जिरलेली होती. मी मेल्यावर काय होईल, याची काळजी माझ्या मनांत नव्हती असं नाहीं; पण जीव द्यायला आलेली असून सुद्धां मरणाच्या घटकेपर्यंत ' मरावं कीं जगावं ' हा विचार डळमळत होता ! दूरवर आगगाडीची धडधड ऐकूं आली. हृदयांत धडकी उठली. मरावं कीं जगावं ? जोरानं द्वंद्व सुरू झालं. एकच क्षण. विचारांचें तुंबल युद्ध सुरू झालं. ' एकच क्षण, विचार करूं नकोस. द अंग झोंकून आणि सूट या कर्मकटकटींतून ! , गाडीची शिटी ऐकली. पाय जड झाले. ' मर. ' आंतून कोणी ढकलूं लागलं. गाडीचे अग्नि ओतणारे डोळे दूरवर दिसले. ' ही एकच वेळ; पुनः लाभायची नाहीं. ' मन घट्ट करून मी झाडापासून रुळाकडे धांवत चाललें. एक प्रकारें उन्माद आला. गाडी जवळ आली. तिच्या धडधडाटानें हृदयाचें पाणी पाणी झालं. डोळ्यापुढें कांहीं दिसेना. गाडी अगदीं जवळ आली. मला घाम फुटला. सर्व बळ एकत्र करून मी दूर दूर पळालें. घामानें ओली चिंब झालें. एकीकडे थंडी वाजल्यासारखं होऊन दांत कडकड वाजूं लागले. पाय जड होताहेत; हृदय थांबताहे असं वाटलं. पण दूर दूर; मी अर्धा फर्लांग दूर पळालें; तरी वाटे, गाडी मागून आली, चालली अंगावरून. आगीचा लोळ टाकणारे ते डोळे मला अजून दिसत होते. मी धूम पळालें.

अंधार असल्यानें मला कोणी पाहिलं नसावं. मी स्टेशनजवळ आलें. एका बांकावर मटकन् बसलें. सर्व शक्ती गळून गेल्या. रेंसभर सुद्धां हलण्याचं त्राण माझ्यांत राहिलं नव्हतं. माझ्या मनांत काय चाललं होतं, हें माझं मला कळत नव्हतं. ती भीति होती का ? असेल ! मी वेड्यासारखी तेथें किती वेळ बसलें ! स्टेशनसारख्या ठिकाणीं माणसांची वीट आणणारी रहदारी असून, एक सुद्धां माणूस माझ्या डोळ्यांना दिसत नव्हतं. आठांचे ठोके पडले. मी चमकलें. माझा जीव देण्याचा प्रयत्न कोणाला कळला असेल काय ? होय. खात्रीनें. जो जो मनुष्य माझ्याकडे पाही. त्याला माझं सगळं रहस्य कळलं, असं मला वाटूं लागलं. आत्महत्त्येचा प्रयत्न केल्याबद्दल सगळं जग मला धरायला धांवल्यासारखं वाटलं. मी क्षणभरही तेथें थांबलें नाहीं. टांगा ठरवून तडक घरीं निघालें. आई काय म्हणेल ? बाबा काय म्हणतील ? आठ नऊ वाजेपर्यंत पोरीच्या जातीनें घरीं कांहीं न सांगतां बाहेर भटकायचं ! काय उत्तर देणार मी ! खोटं बोलायचं मीं निश्चित ठरवलं. घरीं गेलें. " मैत्रिणीनें फारच आग्रह केला म्हणून जेवायला गेलें, आणि घरीं सांगायला अगर निरोप पाठवायला सवडच सांपडली नाहीं " असं आईला सांगितलं. " चांगली फेड केलीस आईच्या उपकारांची खोटं बोलून ! " माझ्या मनानं माझा धिक्कार केला.

पण काय करूं ? न जेवतां अंथरुणावर पडलें. एकीकडे मेलें नाहीं म्हणून हायसं वाटलं, तर दुसऱ्या मनानें माझ्या भ्याडपणाचा उपहास केला. जगांतील दुःखांना व संकटांना भिऊन मरणं हा भ्याडपणा कीं जगून त्यांना तोंड देणं हा भ्याडपणा ? मला या प्रश्नाचं उत्तर मिळालं नाहीं. विलक्षण ग्लानीनं मला घेरलं. मी मेल्यासारखी निपचित पडलें. चार पांच तास जिवंत मरण मला मिळालं. पुढें ते आगगाडीचे राक्षसी डोळे मला रात्रभर भेडसावीत होत. खंगलेल्या शरीरावर भीतीनें मुद्रा ठोकली. मला सडकून ताप भरला.

चार पांच दिवस मी शरीरानें व मनानें अत्यंत दारुण अवस्थेंत सांपडलें होतें.

मरणाचा निश्चय ज्या विचारांनीं माझ्याकडून करवला, त्यांचा पुरा नायनाट झाला; त्यामुळें माझं आत्मिक सामर्थ्य नष्ट झालं; मन कमकुवत झालं. दिव्य मरण आपल्याला लाभणार नसून दुःखी जीवन अगर सुखी पण लांछनास्पद जीवन हाच आपला भाग, अशी माझी खात्री झाली. ज्यांनीं मला मरणाचा निश्चय करायला लावलं, त्याच विचारांनीं माझं जीवन दुःखी होणार, लांछनास्पद होणार, असं मला दाखवलं होतं. पण मरणाचा निश्चय ढांसळला व मी भ्याडपणानें ज्या क्षणीं पळालें, त्या क्षणीं त्या विचारांचाही धुव्वा उडाला व दुसरे विचार प्रभावी झाले. "तूं मरूं शकत नाहींस; व एकटं जीवन कठणं तुला दुःखाचं होतं, तर तूं न पटणारी गोष्टही कर. तुला लोकांच्या दृष्टीनें तें अग्निकुंड वाटलं, तरी तेंच खरं सुखाचं जीवन आहे" असं ते विचार मला बजावून सांगूं लागले.

माझ्या निःशक्त झालेल्या शरीराला व मनाला हाच विचार पटूं लागला. मरणाच्या दारांतून ओढून काढलेल्या या निकस शरीराला सकस करायला तो जिव्हाळाच पाहिजे आहे. मनाच्या वेदना त्या जिव्हाळयानेंच शमणार आहेत, असं मनाला वाटूं लागलं.

सतत उद्योग करणं, हा मार्ग पसंत असला, तरी शरीरांत काम करण्याचं त्राण नव्हतं. शरीरांत त्राण नव्हतं म्हणून मन सैरावैरा धांवूं लागलं. देवा, मला अविचारी कां नाहीं केलंस ? पतंगानें दिव्यावर झेंप घ्यावी तशी मीं अविचारानें कोणत्याही दिव्यांत झेंप घेतली असती. पण मला सर्व दिसत होतं. सर्व परिस्थिति कळत होती. त्यावर विचार करतां येत होता. म्हणूनच हा एवढा त्रास !

माझी मनोव्याधि कोणाला कळेल का ? माझ्या भूमिकेवर येऊन कुणी विचार करूं शकेल का ? मीं उद्यां लग्न केलं तर—तर लोक

म्हणतील 'सुशिक्षित मुलीचं अधम कृत्य !' 'सुशिक्षित मुलीची अक्कलशून्यता !' 'सुशिक्षित मुलीची स्वार्थांधता !' त्यांच्या या सहज काढलेल्या उद्गारांनीं माझ्या सात्विक भावनांना, मृदु मनाला, विव्हल हृदयाला जळत्या मशाली लागतील, हें त्यांना कोठून माहीत असणार ? मी किती सोसलं, किती रक्त आटवलं, किती मन मारलं, कसं शरीर मारूं पाहिलं, हें त्यांना किंचित् तरी कळेल का ? शिकारी मनुष्य सहज लीलेनें आकाशांत गोळी झाडतो. ज्या पक्षिणीच्या शरीरांत ती गोळी शिरून रक्ताच्या चिळकांड्या उडतील, तिलाच त्या गोळीच्या वेदना कळतात. लोकांनीं सहज लीलेनें केलेल्या टीकेच्या वेदना मलाच कळतील.

हृदयांत उत्पन्न झालेली प्रेमाची पवित्र ज्योति कधींच विझूं शकत नाहीं, असें प्रेमांधपणें मी म्हणूं शकत नाहीं. पण त्याबरोबर हेंही विसरून चालत नाहीं, कीं ती ज्योति ज्यानें पेटविली, त्यानेंच फुंकरून टाकली तर विझते किंवा स्वतःच्या मनानें काजळी वाढविली तर विझते. अरुणानें माझ्या हृदयांत ज्योत पेटविली. त्यानें औदासिन्य, राग, तिरस्कार किंचितही दाखविला असता तर ती ज्योति विझली असती किंवा माझ्या मनांतील प्रतिकूल ग्रहानें ती विझूं शकली असती. पण असा कांहींच प्रकार नव्हता. अशा स्थितींत ती ज्योत ज्याच्या हृदयांत तेवत असेल, त्याला स्वतःला ती विझवणें कठीण, नव्हे, शक्यच नसतं. तेलवात सरली तर दिवा विझतो. जीवनरस आटला कीं ही ज्योत विझते. दिवा विझतांनाच मोठा होतो. ही ज्योत जविनरस जसजसा शोषते तसतशी अधिकाधिक भडकते. ती विझवूं लागल्यास सबंध देहांत वणवा पसरतो. अशी ही प्रीतीची ज्योत आहे. महान् महान् लोकांनाही हिच्यापुढें मस्तक नमवावें लागलें आहे. नेपोलियन्सारखा अखिल जगाला चळचळ कांपविणारा तेजस्वी पुरुष हिच्यापुढें निष्प्रभ झाला. त्यानें

तो कलंक लावून घेतला. पण हें प्रीतीचं गीत कोणाला पटेल? अशा प्रीतिमुळेंच लग्न केलं असलं तरी जग त्या प्रीतीची थट्टा करणार; तिला विषयलालसाच्च म्हणणार! 'सुशिक्षित स्त्रीची विषयलालसा' म्हणून दौंडी पिटणार. ही जर विषयलालसा तर प्रत्येक लग्न हीसुद्धां विषयलालसा आहे; आणि जगांत लग्नं होत आहेत, तोंपर्यंत तीं विषयलालसा पुरवण्यासाठींच होत आहेत. मग मलाच कां नांवं ठेवावीं ? पण जगाच्या तोंडाला कोण हात लावील ?

एका वाट चुकलेल्या स्त्रीस लोक दगड मारीत असतां, येशू ख्रिस्तानें सवाल केला, कीं ज्याला पाप शिवलें नाहीं त्यानें या स्त्रीस मारावें. त्या मोठ्या थोरल्या जमावांतील एकाही माणसाला दगड उचलून मारण्याचं धैर्य झालं नाहीं. येशूच्या जगापेक्षां आतांच्या जगांत नैतिक उन्नति अधिक झाली आहे; आणि म्हणून जगानें कशालाही व कोणालाही नांवें ठेवावीं अशी वस्तुस्थिति आहे काय ? तेंच तें पापी जग त्रिकालाबाधित आहे. मग कशाला मी त्या जगाची पर्वा करूं? कमीअधिक प्रमाणांत स्खलनशील असलेल्या जगानें आपल्या पायाखालीं काय जळतें आहे तें न पहातां, दोषी अगर निर्दोषी माणसाला टीकेच्या सुळावर चढवायचं! कोण विचारतो त्याला! त्या जगानेंच आपल्या बेफाम जिव्हांनीं माझ्या आयुष्याला भयंकर वळण दिलं! पण हा माझाच कृतघ्नपणा नाहीं का ? जग वाटतं तितकं खरंच निष्ठुर आहे का ? नाहीं. उलट तें अधिक उदार आहे. एखाद्याच्या मूर्खपणाबद्दल तें जळजळीत टीका करील अगर शहाणपणाबद्दल स्तुतीचीं सुमनं वाहील.

लोकवदंतेनें वाहून जाऊन अशा स्थितीला पोहोंचणारी मीच मूर्ख व दुबळ्या मनाची आहें. पण येथून माघारी कशी फिरूं? माघारी फिरावं म्हणूनच ना मी नि अरुण एकमेकांपासून दूर गेलों ? पण मन नाहीं दूर जात! दूर गेल्यावर तें अधिक जवळ येतं. ज्या

भुताला भ्यावं, त्यालाच भीतीमुळें बिलगावं अशी माझी स्थिति झाली होती. माझ्या मनाची भीति, माझ्या आयुष्याची भीति, सुधेच्या आयुष्याची भीति, अरुणाच्या आयुष्याची भीति, जगाची भीति, सगळीकडून भेडसावलेली मी नको त्यालाच–अरुणालाच–बिलगूं पहात होतें.

सुधेच्या सुखाचा पेला हिसकावून घेऊं का ? अरुणाला माझ्यासाठीं लोकांचे वाग्बाण सहन करायला लावूं का ? अरुण, माझं तुझ्यावर किती प्रेम आहे ! तें लोकवदंतेनेंच निर्माण केलं असेल, पण मी त्यांत जीव भरला आहे. माझ्या रक्ताचा बिंदु नि बिंदु अरुणाच्या आशेनेंच शरीरभर धांवत आहे. अरुण, माझ्या वेड्या मनासाठीं तुला गुंतवूं का ? माझ्या खुळ्या मनासाठीं तुला लौकिकी अपयशाच्या सुळावर चढवूं का ? हेंच का माझं प्रेम ? हा स्वार्थ तर नाहीं ? आणि सुधे ? भाबड्या पोरी ! माझी बहीण तूं ! तुझ्या अल्लड भाबड्या जीविताचा आत्मा काढून घेऊन त्यावर निखारा ठेवूं का ?

अरुण, तुझ्यावर माझं प्रेम आहे. सुधे, तुझ्यावरही माझं प्रेम आहे. तुमचं दोघांचं माझ्यावर आहे. पण सुधे, तुला माझ्या भूमिकेवर येतां येईल का ? माझ्या मनाचीं खांडोळीं पाहून तुला माझी कींव येईल का ? मी नको तें केलं, तर तुला माझ्या मैत्रीचा नि प्रेमाचा कपटीपणा वाटेल नाहीं ? तुला मी जवळ घेऊन हृदय फाडून दाखवलं तरी माझ्या मनाचं सत्य कळणार नाहीं—नको. तुझ्यासारख्या नाजुक फुलाला अग्नीची धग नाहीं मी लावणार ? अरुणाच्या, सुधेच्या व माझ्या लौकिकी यशासाठीं मी त्यागच करीन. सर्व त्यागांत हा त्याग मला श्रेष्ठ वाटतो. कारण प्रेम ही आयुष्यदीपिकेची तेलवात आहे. माझा आयुष्याचा दिवा विझण्यासाठीं मी तिचा त्याग केला तर ? तो ईश्वराच्या घरीं रुजू नाहीं का होणार ?

त्याग ! त्यागाची भाषा बोलायला किती सोपी व गोंडस वाटते ! पण मनाच्या इच्छेविरुद्ध त्याग करणं किती कठिण आहे, हें ज्याचं त्यालाच माहीत. डोळ्यांपुढें पंचपक्वान्नांचं ताट भरलेलं आणि पोटांत अन्नाचा कणही नसल्यानें पंचप्राण व्याकुळ झालेले. अशा स्थितींत त्या पंचपक्वान्नांकडे ओझरती दृष्टीही न टाकण्यांत होणाऱ्या वेदना ज्याच्या त्यालाच कळणार ! पोटभर जेवलेल्या माणसानें अगर अजीर्ण होऊन अन्नावरील वासना उडालेल्या माणसानें अन्नत्यागाची भाषा उच्चारली, तरी त्या भाषेंत कितीसा राम असणार !

माझं मन भुकेलेलं आहे. पंचपक्वान्नांचं ताट त्यापुढें वाढलेलं आहे. अशा स्थितींत मी तें डावलून पुढें जावं, असं म्हणणारांना माझ्या कासावीस होणाऱ्या प्राणांची कल्पना कशी येणार ? देवा, अरुणाशिवाय मी मनानें कोणाला वरलं नाहीं. माझ्या एकनिष्ठेचं फळ तूं काय देणार ?

मानसिक यातना ! पण त्या नाहींशा कशानें होणार ? अरुणाला जवळ करण्यानें सुधेसाठीं मानसिक यातना होणारच. अरुणापासून दूर गेल्यानें स्वतःसाठीं जीव तळमळणारच ! सुधेची समजूत कालांतरानें पटेल का ? तशी पटवून आम्ही दोघी एका प्रेमाच्या वांटेकरणी होणार नाहीं का ? पण अरुणाचं माझ्यावरील प्रेम लोकांच्या विषारी टीकेनें जळून खाक तर नाहीं होणार ? प्रेमाच्या पहिल्या संध्येचा गोड अनुभव घेतल्यावर अशा संसाराची कटुता तर प्रत्ययाला नाहीं येणार ? नाहीं. मला उत्तरच सांपडत नाहीं. भीति वाटते ! समाधानाचा विचारच येत नाहीं आणि पाऊल पुढें पडत नाहीं. जाऊं दे ! शरीराचे नि मनाचे धागे तुटेपर्यंत मला विचार करूं दे. कारण लग्न ! एकदां केल्यावर मागें येतां येणार नाहीं ! एकदां सुखाच्या जीवितांत कालवलेलें विष निराळं काढतां येणार नाहीं ! लोकवदंते, काय हा माझ्या दुबळ्या मनाचा छळ केलास ?

---

# तूं आई कीं दावेदारीण ?

त्या दिवशीं आईनें मला नाहीं नाहीं तें बोलून घेतलं. जणुं मी तिच्यावर कांहीं कुभांड घेतलं नि खरी ती सदाचरणी आहे असाच तिच्या बोलण्याचा रोंख होता. क्षणभर मी चुकलें असं मला वाटलं. त्या दिवशीं आम्ही दोघींनीं एकामेकींशीं अबोला धरला तो दोन दिवस टिकला होता. मला वाटलं, कीं मामा नि आई फार लाडिकपणं वागतात नि लोक नांवं ठेवतात, एवढया आधारावर मी आईला असं नको होतं बोलायला. किती दिवसांनीं जरा कुठें पश्चात्तापाची धग मनाला त्या रात्रीं लागत होती.

मी तशीच विचार करीत माझ्या अंथरुणावर पडलें होतें. मला झोंप येईना, पण आईशीं अबोला, तेव्हां झोंपेचं सोंग करून पडलें होतें. खोलींत अंधार होता. पण डोळे ताणून पाहिलं तर दिसतही होतं. रात्रीं एकचा ठोका पडला. मला झोंप आली नाहीं. आईच्या बांगडया वाजल्या. ती उठून बसली नि हळु हळू दाराकडे चालली. मीं दाराकडे पाहिलं.

तोंपर्यंत मला कांहीं विशेष वाटलं नव्हतं. पण दाराकडे पाहिलं, तों मामा दारांत उभा ! मला आश्चर्य वाटलं ! माझ्या पोटांत धडधडूं लागलं. मामा दारांत मुकाट्यानं कां उभा ? आई कशाला उठली ? तीं दोघं कुठें गेलीं ? माझ्या अंगांतील नस न् नस उडत होती. मला कांहीं कळलं नव्हतं. पण कांहीं चमत्कारिक वाटलं खरं.

एकदां मनांत आलं, मोठ्यांदा ओरडावं म्हणजे आई परत येईल. एकदां वाटलं हळूच उठून पहावं, हीं कुठं जातात नि काय करतात ! मी उठून बसलें. पण कसली तरी भीति वाटूं लागली. मला उठवेना. मी ‘ आई ’ म्हणून मोठ्यांदा ओरडलें.

आई आली. तिनें दिवा लावला. ती घामाघूम झाली होती. कांहीं वेळानें मामा आला, तोही घाम निपटीतच. दोघंही भ्याल्यासारखीं दिसत होतीं. मी त्यांच्याकडे पाहिलं. कां कोण जाणे ! दोघांच्याही नजरा जमिनीकडे वळल्या.

आईनें विचारलं, " कां ग ओरडलीस ? " मी म्हटलं, आई तुम्हांला दोघांना जातांना पाहिलं न् मला भीती वाटली."

* * *

मामा जो एकदां कांहीं कारणानें गेला, तो या तीन चार महिन्यांत आला नव्हता. मला अगदीं किती बरं वाटलं म्हणून सांगूं ! अगदीं मनांतलं बोलायचं म्हटलं तर मी असं म्हणेन, कीं मला ' मामा मेला ' असं कुणीं सांगितलं असतं, तर मुळीं सुद्धां वाईट वाटलं नसतं. तो आईचा सख्खा भाऊ थोडाच होता ! बोलून चालून मानलेला भाऊ ! ' मानीव दादा ' ची सांथ आईला पण लागली होती.

माझ्या आईंत या दोन महिन्यांत किती फरक झाला होता ! ती रिकाम्या वेळांत दासबोध, गुरुचरित्र नाहींतर असलंच कांहीं वाचीत असे. जेवायची सुद्धां एक वेळ. कधीं कधीं आई रडत बसलेली मला दिसे. रात्रीं अंथरुणावर हुंदके देत पडलेली मी तिला कित्ती वेळां पाहिली. आईच्यांत इतका कसा बदल झाला ? आईला झाल्या गोष्टीचं वाईट वाटत असावं ! माझी आई आहेच चांगली. नाहींतर माझे तरी विचार इतके चांगले कसे झाले असते ! तो मामाच मेला वाईट. बोलून चालून ओळखिचा गृहस्थ. तीनतीनदां येऊन मेला लघळपणा करायचा ! आई किती प्रेमानें आमचं सबंध वेळभर करी ! पण तिच्या चेहऱ्यावरची उदासीनता एक क्षणही नाहींशी होत नसे. आतां मामाचं नांव काढलं, तरी ती उसळून उठे नि त्याला वाटेल तसं बोलून घेई. मला किती बरं वाटे तें ऐकतांना ! माझी आई मला मिळाली असं वाटूं लागलं. भक्तिभावानें ती पूजा करतांना पाहून

मला गाईवर येई. मी पण देवाला म्हणे, " माझी आई मला अशीच सदैव लाभूं दे. "

माझी आई किती सशक्त नि तेजस्वी दिसायला लागली होती ! मला ती किती तरी आवडे. माझं पूर्वीचं तुटक वागणं आतां राहिलं नव्हतं, म्हणूनच मला वाटतं ती कधीं कधीं माझ्याकडे नि सुमीकडे पाहून एकदम रडायला लागे !

एक दिवस सकाळीं मी उठलें. आईच्या कपाळावर केवढं मोठं टेंगूळ मी पाहिलं ! आईनें डोकं फोडून घेतलं कीं काय ? का लागलं कुठें ? मी आईला विचारलं. ती रडायला लागली. मीं पण रडूं लागलें. " आई, असं काय करतेस ? माझ्यावर रागवलीस होय ? आई, तूं माझी आहेस. मी नाहीं तुला कधीं बोलणार न् दुखवणार. "

आई अधिकच रडूं लागली. आईला इतका पश्चात्ताप व्हावा, तिनें शरीराला अपाय करून घ्यावा, याचं मला वाईट वाटूं लागलं. आई कुठें तरी औषध आणायला जाई. तिला काय होत होतं कुणाला माहीत ! खरं म्हणजे दिवसेंदिवस ती किती तरी लठ्ठ दिसत होती !

* * *

" सुमे, तुला भाऊ हवा का बहीण ? " एका बाईनें सुमीला विचारलं. आई नि मी बोलत बसलों होतों तेव्हां तिनें आम्हांला हें सांगितलं. आई डोळ्यांला पदर लावून रडूं लागली. तिनें ताड्ताड् डोकं आपटून घेतलं.

" देवा कशी मीं चांडाळीण जन्माला आलें ! आतां कुठं हें काळं तोंड लपवूं ? "

माझ्या पोटांत चर्र झालं ! आई गरोदर आहे ? "आई, खरं का ?" मी घाबरून आईचा दंड जोरानें धरून म्हटलं. तिनें रडत म्हटलं, " ही चांडाळीण तुमची आई नाहीं बरं ! " मला काय करावं सुचेना. मला धड रडूं येईना कीं कांहीं होईना.

आईचे क्लेश पाहून माझ्या पोटांत तुटत होतं; पण तितकाच मला तिचा तिटकारा आला. मी तिथून उठलें. घराबाहेर पडलें. एकदां वाटे आपणच मरून जावं. नको असली आई. किती नीच आई आहे ही ! ही माझी आई, असं तरी मी कसं म्हणूं ? घर सोडून जाऊं का ? मग तिचं वाटेल तें होऊं दे. पण जाऊं कुठें ? आणि सुमी ? त्या लहान पोरीला कळत असेल का काय आमच्या उभ्या आयुष्याला काळोखी लागली आहे ती ? तिला आईपाशींच ठेवून मीच कुठें गेलें तर ? पण आईजवळ राहून सुमी तरी चांगली राहील का ? कांहीं नाहीं. मावशीकडे जाऊन तिला पायां पडून सांगतें, ‘ मी तुझ्याकडे राहतें ’ म्हणून.

मी मावशीकडे गेलें. मी कांहीं बोलायच्या आधींच मावशीला सगळं कळलंच होतं. तिनं आईला शिव्यांची लाखोली वाहिली. मला मुळींसुद्धां वाईट वाटलं नाहीं.

मी मावशीला म्हटलं, “ मावशी, आई ही अशी. आमचं दोघींचं कसं व्हायचं पुढं ? आम्ही तुझ्याकडे येऊं का राह्यला ? ”

मावशी उसळून म्हणाली, “ लाज नाहीं वाटत विचारायला ? माझं गुणांचं पोर तुझ्या आईमुळेंच बिघडलं नि तूं तरी काय तशीच ! अग, ‘ खाण तशी माती ’ असायचीच ! तुम्हांला दोघींना घरांत ठेवून माझं वाटोळं नाहीं मला करायचं. मला माहीत आहे तूं पण काय आहेस ती ! आई न् तूं उगीच नाहीं त्या मामाच्या भोंवतीं नाचत ! ”

काय भयंकर आरोप हा ! मला डोळ्यांपुढें अंधेरी आल्यासारखं झालं. नको. मला कुणी नको. आई नको, मावशी नको. मी मावशीला जीव तोडून सांगितलं तर तिनें माझ्याबद्दलच असं म्हणावं ? नकोच तिथें राहणं अन् शिवाय तिचाही मुलगा बिघडला असं ती म्हणते ! नकोच. आगींतून उठून फुपाट्यांत कुठें शिरूं ? मी मावशीकडून निघालें.

पण जाणार कुठें ? घरींच आलें. आई दासबोध वाचीत बसली

होती. जें पुस्तक तिच्या हातीं पाहून मला काल समाधान वाटत होतं, त्याच पुस्तकानें माझा आईबद्दलचा तिटकारा वाढवला. कशाला हीं भक्तीचीं ढोंगं हवींत ? असं म्हणायचं अगदीं जिभेवर आलं होतं. पण मी काय बोलणार ? आईजवळ कांहींसुद्धां बोललें नाहीं.

रात्र झाली. कशींबशीं जेवणं झालीं. माझ्यासारख्या वयाच्या मुलीं किती आनंदानें झोंप घेत असतील ! अलिकडे मला घरच्या परिस्थितीनें अंथरुणावर पडतांच कधीं लागलीच झोंप आल्याचं आठवत नाहीं. आईचा तर नाश झालाच. पण माझं पुढं कसं होईल ? सुमीचं कसं होईल ? ही चिंता माझ्या मनाला सारखी जाळून टाकी. त्या दिवशीं ही चिंता परमावधीला गेली. माझं डोकं भयंकर दुखूं लागलं. अजूनपर्यंत लोकांची निंदा कठोर असली तरी बरं वाईट असं कांहीं घडलं नव्हतं, पण आज आईच्या बाबतींत जें कृष्ण सत्य मला कळलं, त्यानं तर माझ्या अंतःकरणाच्या चिंधड्या उडवल्या. विचार ! विचार !! विचार !!! किती वेळ, किती तऱ्हांचे निकसले विचार मीं केले ! कशाला असली आई ? तीं तरी मरावीं, नाहीं तर मी तरी मरावी एकदांची. कशाला असल्या आईजवळ राह्यचं. आईनें तर आपलं तोंड काळं केलंच. पण माझ्या तोंडाला विनाकारण काळं फासलं. माझ्याकडे मुलीं यायचं टाळीत. एकादी आलीच तर दोन चार दिवसांतच येईनाशी होई. माझी आई अशी आहे हें कळलं वाटतं हिला ! मला अगदीं मेल्याहून मेलं होई. माझं कसं होणार ? लोक म्हणतात, 'खाण तशी माती.' मी किती साधी राह्यलं, कितीही आचरण पवित्र ठेवलं तरी लोक म्हणणार, "माहीत आहे वेसवेचा पावित्र्याचा दिमाख !" कसं दाखवूं मी माझं अंतःकरण लोकांना ? काय होणार माझं ? कोण माझी काळजी करणार ? आईच्या या नरकवासांतून सुटायला मीं लग्न केलं तर ? होय. हाच मार्ग आहे. मग सुटेन या सगळ्यांतून. सुमीला मी संभाळीन.

पण कोण माझं लग्न करणार ? मी खूप विचार केला. शेवटीं विचार असह्य होऊन मी एकदम उठून बसलें; आईला हांक मारली. ती जागीच होती. तिला तरी झोंप कशी येणं शक्य होतं ? प्रसंग तिच्या-वरच खरा बेतला होता. मी म्हटलं " आई, तूं काय करणार आतां ?"

" विष खाऊन मरणार. "

मला एकदम भीति वाटली. पण कां कोण जाणें एकदम असंही वाटलं, कीं हें खरं नाहीं. खरं असतं तर पांच महिने वाट न पाहतां आधींच आईनें विष खाल्लं असतं. मी कठोर झालें होतें. थोडा वेळ थांबून मी म्हटलं, " आई, लोक आमच्याबद्दल काय बोलतात तुझ्यामुळें ? आमचं कसं व्हायचं पुढं ? "

" मला ती काळजी नाहीं का ? "

" म्हणून वाटतं हें सगळं ? "

" लीले, नको आतां डागण्या देऊं मला. काय म्हणशील ते सगळं खरं आहे. पण काय करूं ? मरण माझ्या हातचं नाहीं. "

" पण आई आम्ही दोघी काय करूं ? आज किती दिवस मला वाटतं कीं, लग्न करून टाकावं म्हणजे या सगळयांतून कायमची बाहेर पडेन."

" लीले, आतां कोण पाहणार लग्नाचं नि कोण पतकरणार ? "

माझ्या डोक्याचीं विचारांनीं शकलं तर नाहीं ना उडणार असं मला राहून राहून वाटत होतं.

\+ * +

अवघा अर्धा तास अवकाश होता लग्नाला. मी गौरीहरापाशीं बसलें होतें माझ्या मनांत किती कालवाकालव चालली होती याची कल्पना मी कुणाला नि कशी देणार ? प्रत्येकीनें स्वतःच्या लग्नांतच तो अनुभव घ्यायला पाहिजे.

मांडवांत बायका पुरुष जमायला लागले. कणाकणानें लग्नघटका भरत होती. क्षणाक्षणांनीं मुहूर्त जवळ येत होता. माझ्या हृदयाचे

धडधडणारे ठोके मला स्पष्ट ऐकूं येत होते, भोंवतीं जमलेल्यांनाही कदाचित् ते ऐकू जात असतील ! अंतःपटाचें काय तें अंतर ! पलीकडे अनोळखी व्यक्ति ! भटजींचे ते भीति दुणावणारे निर्विकार सूर ! माझी माळ पडेल ना बरोबर त्यांच्या गळ्यांत ! माझ्या भीतीनें कांपणाऱ्या हातांतून ती गळून तर नाहीं ना पडणार ? हजारों विचारांनीं मी अगदीं गुदमरून गेले होतें. अवघीं दहा मिनिटं उरलीं. मी अंतःकरणाला धीर देत होतें.

इतक्यांत 'काय झालं ?' 'काय झालं ?' म्हणून जें तें विचारूं लागलं. जिकडे तिकडे गलबला नि गडबड सुरू झाली.

कुणाला कांहीं कळेना. "झालं काय ?" अवघ्या दहा मिनिटांतच काय झालं ? मी तर थरथर कांपूं लागलें. 'नवरा मुलगा मंडपांतून निघून गेला !" मला भोवंड आली. कसली गोड चिंता करीत होतें क्षणापूर्वी नि झालं काय हें ! मी मुंडावळी काढून टाकल्या. लाजेनें नि भीतीनें मी अर्धमेली झालें होतें. जें तें माझ्याकडे पाही न् कुजबुजे. असं कां ?

सगळा मंडप ओस पडला. धरण फुटावं नि अडून राहिलेलं पाणी दिशादिशांना वाट फुटेल तसं ओघळत जावं, तसंच झालं. मांडव सोडून बातम्या जो भेटेल त्याला कवटाळीत गेल्या. पण झालं काय ? मला कांहींच कळलं नाहीं. माझ्या नशिबाचा प्रश्न. त्याची चर्चा माझ्याशिवाय सगळीं मन मानेल तशीं करीत गेलीं. अवघ्या पांच मिनिटांचा खेळ !

* * * *

नवऱ्या मुलाला मित्राची तार आली कीं, मुलीची आई वाईट चालीची आहे. तशीच मुलगी नसेल कशावरून ?

* * * *

आई, तूं माझी आई कीं दावेदारीण ?

---

# ताई, हेच बरं सुखाचे संसार !



मी अशिक्षितच आहें म्हणायला हरकत नाहीं. मग माझी कसली आली आहे कथा नि कहाणी ? माझी कथा म्हणून मी कुणाला सांगायला गेले तर लोक म्हणतील, केरू नि पोतेरूं करणारीची कसली कहाणी असणार ? आमच्या सारख्यांना कसलीं आलीं आहेत दुःखं नि कसले आले आहेत विचार ? ताई, तूं मला माझ्याबद्दल विचारतेस, तेव्हां तुझ्या मनांत सुद्धां असंच आलं असेल नाहीं ? पण येऊं दे आलं तर. रानांत झाडांवर फुलं आलीं, हंसलीं, डुलली, सुकलीं नि गळून पडलीं. तिकडं कुणाचं असं लक्ष जाणार ? एखादंच फूलवेडं त्या फुलाकडे ओझरती नजर टाकील, पण बाकीच्यांनीं ओझरती नजर जरी टाकली नाहीं तरी एक क्षणभर कां होईना, तें फूल फुललंच ना ! क्षणभर तरी जगलंच ना ? त्यालाही भलाबुरा आयुष्याचा क्षण काढावा लागला तसंच माझं ! माझी किंमत कांहीं नसली तरी आयुष्याचीं सुखदुखं मलाही आहेत ! म्हणूनच मीं तुला सर्व लिहायचं ठरवलं.

मी दिसायला चांगल्यापैकीं होतें ह्मटलं तर मला रूपाचा गर्व आहे असं नाहीं ना तूं म्हणणार ? मला सगळींच म्हणत, मुलगी कशी नक्षत्रासारखी आहे; म्हणून मीं तरी माझ्या रूपाबद्दल असं बोलायचं धाडस करतें. माझ्या रूपाचा गर्व मी कशासाठीं धरायचा ? तें रूप मला कांहीं फारसं उपयोगीं पडलं नाहीं. सुरूप मुलींना लग्नाला त्रास पडत नाहीं ह्मणतात, पण मला तर वाटतं, लग्नांत दैवाचाच हात अधिक असतो. अगदीं साधारण रूप असूनसुद्धां कांहीं मुलींना लवकर नि चांगलीं स्थळं मिळतात; उलट कांहींना नांव ठेवायला जागा नसून सुद्धां आईबापांना त्यांच्या बाबतींत ‘ ही आपल्या गळ्यांत एक

धोंडच आहे ' असं वाटल्याशिवाय रहात नाहीं. इथं दैवाचा हात नाहीं तर काय म्हणायचं ?

माझ्या आईला व बाबांना माझ्या लग्नाची किती काळजी लागली होती हें एक त्यांना कीं मला माहीत ! घरांत दररोज एकदां तरी त्याबद्दल बोलणीं चालत आणि तीं सुद्धां माझ्या देखत. मी कांहीं लहान नव्हतें. विसावं वर्ष मला चालू होतं. घरांत जीं बोलणीं चालत त्याचा परिणाम माझ्यावर झाल्याशिवाय कसा राहणार ? शिवाय घरांत कधीं कांहीं चुकलंमाकलं कीं आई म्हणायची, " सासरीं अशीच का वागणार आहेस ? चांगला आईचा उद्धार करशील. " हें आईचं बोलणं जरी मला कडक वाटलं, तरी तें कळकळीचं होतं; हेंही मला कळत होतं. यामुळें माझ्या प्रत्येक वागणुकीला माझ्या लग्नाच्या विचारांनीं पायबंद पडलेला असे. आणि वाटे, केव्हां एकदां लग्न होऊन जाईल कोण जाणे ! केव्हांही रिकामा वेळ सांपडला कीं, असलेच विचार माझ्या मनांत येत. मैत्रिणी जमल्या तरी गप्पा निघायच्या नि वळणं वाकणं घेत गप्पांचा शेवट व्हायचा तो असल्या बोलण्यांतच.

माझा वेळ लिहिण्यावाचण्यांत मी घालवावा इतकी मी कुठें शिकलें होतें ? आणि ताई, अगदीं मनांतलं बोलूं का ? इंग्रजी शाळेंतल्या ज्या मुली माझ्या ओळखीच्या आहेत, त्यासुद्धां अभ्यासापेक्षां याबद्दलच अधिक बोलतात आणि टवाळी, निंदानालस्ती, अगदीं आम्हां अडाणी बायकांच्या सुद्धां पलीकडली करतात. शिकलेल्या मुलींबद्दल मीं असं म्हटलं म्हणून तूं रागावूं नको हं माझ्यावर ! पण मला त्यामुळें असं वाटतं खरं, कीं कितीक मुली शिकल्या आणि कितीक मुली अडाणी असल्या तरी त्यांचा जिव्हाळयाचा विषय हाच असतो. पंधरावं वर्ष उलटलं न उलटलं तोंच लग्नं, बायका पुरुषांच्या बाबतींतली कुटाळी हे विषय अगदीं निघायचेच आणि

राईचे पर्वत करून सांगण्याची हौससुद्धां तेव्हांपासून असते. तरी मी म्हणतें, या मुलींचीं मनं गुंतायला पुस्तकं तरी असतात. माझ्यासारख्यांचं वय जाणतं झालेलं, तेव्हां शरीर जरी कामांत गुंतलं असलं तरी मनानें काय उद्योग करायचा ? असल्याच दलदलींत भटकायचं.

मी शेजाऱ्यापाजाऱ्यांच्या मुलींचीं लग्नं झालेलीं पाहीं. मैत्रि-णींच्या लग्नांना न चुकतां जाई. त्यांची मला खडान् खडा माहिती लागे–नव्हे, ती कळून घेणं हा माझा नित्याचा उद्योगच होता. याचा परिणाम म्हणून मलाही माझे भावी यजमान अशा अशा तऱ्हेचे असावे असें वाटे. कोणाचं तरी स्थळ आणायचं आणि तिथें मला दाखवायचं हा नेहमींचाच प्रकार होता. त्यावेळीं कळसूत्री बाहुलीप्रमाणें मी पुढें जात असलें, तरी मनांत भीति वाटे कीं, कसं हें स्थळ असेल कुणाला माहीत ! कशीं माणसं भेटतील कुणाला माहीत ! एक ना दोन. किती तरी विचार माझ्या मनांत येऊन जात. मला कितीकांनीं पाहिलं नि कितीकांनीं नाकारलं असेल.

माझे वडील जुन्या मताचे. त्यांचा मला पुष्कळ वेळां राग येई. कारण कितीतरी वेळां मला चांगलं लिहितां वाचतां येत नाहीं म्हणू-नच नडायचं. आणि मला असं वाटे, कीं मला जुन्या घरींच पडावं लागणार, मग माझ्या मैत्रिणींसारखं कुठलं आलं आहे नव्या पद्ध-तीनें वागण्याचं सुख ? तो सासुरवास ! तो भित्रेपणा ! तो चोरटेपणा ! मला काय हवं होतं तें कसं मिळणार ? कुठेंतरी खेडवळासारखी नि काचांत राहीन ! खरं सांगूं का ? माझ्या मनाला लागलेल्या टोंचण्या कोणत्या तऱ्हेच्या होत्या हें सांगायची सुद्धां मला लाज वाटतें.

रिकामपणीं कधीं दारांत उभी असलें तरी याच हुरहुरीमुळें, माझें लक्ष रस्त्यानें ऐटींत जाणाऱ्या तरुणांकडे जाई. ताई, लाज वाटतें मला सांगायला, पण संध्याकाळीं मैत्रिणींच्या नादानें सभेला गेलें कीं

बोलणारा काय बोलतो इकडे माझं लक्षही नसे; मला तें कळतही नसे. मग नुसतं जमलेल्या लोकांकडे पहाण्यापलीकडे मी काय करणार ? खरंच ! मनांत काय विचार येतात, हें जर बाहेरून दुसऱ्याला कळतं तर किती अनर्थ झाला असता ! माझं मन सैरावैरा धांवूं लागे. कित्येकां-कडे मी पहात असतां माझ्या मनांत नाहीं नाहीं त्या कल्पना येत; पण लगेच मी कावरी बावरी होऊन माझंच मन मला डिवचूं लागे.

कुठला शारदा का कायसा कायदा झाला. तेव्हांची सभा अजून मला आठवते आहे. त्या वेळीं माझ्या मनांत अगदीं असं आलं कीं कशाला हा कायदा झाला ? यानें लग्नाला मुली मोठ्या होणार. त्यांत त्यांना धड शिकवलं सुद्धां जर नाहीं तर माझ्या मनांतल्या प्रमाणेंच त्यांच्याही मनांत लग्नाच्या गोष्टीं धिंगाणा घालीत राहतील ? आणि मोठेपणीं विचार करून मनानें एकादी गोष्ट ठरवली अन् ती मिळाली नाहीं तर तोंड दाबून बुक्क्यांचा मार ! या जाणत्या दुःखापेक्षां पूर्वीचें नेणतें दुःख पुष्कळच बरें. अडाणी म्हणून घरांत बोलायची चोरी; कारण सगळीं हंसतील. पण अशा वेळीं मनं कशीं हैराण होतात हें त्या मुलींचं मुलींनाच माहीत ! असे किती तरी विचार त्या दिवशीं मनांत आले. ते यायला कारणंही होतीं.

मला जेव्हां जेव्हां दाखवीत, तेव्हां कोणी म्हणे, हिला मराठीच येत नाहीं; कोणी म्हणत, हिला इंग्रजीच येत नाहीं; कोणी म्हणत, ही फारच वाढली; कोणी म्हणत, हिला कसला मिळतो प्रथमवर ! कोणी येत ते पहिली बायको मेलेले दोन दोन पोरांचे बाप असत. जो कोणी मला पाहून जाई, त्याच्याकडून उत्तर येईपर्यंत त्याच्याबद्दल मी विचार करीत राहीं. त्यानें नाहीं म्हटलं कीं दुसऱ्याबद्दल. धिक्कार असो माझ्या मनाला ! मनानें मी किती पापं केलीं असतील आणि किती जणांना माझ्या मनांत यजमान म्हणून वागवलं असेल कोण जाणें ! दर आठ पंधरा दिवसांनीं 'नाहीं' हें उत्तर

मिळाल्यानं काय धक्का मनाला बसत असेल माझ्या, याची कल्पना मी तुला कशी देऊं ?

कोणाला पावित्र्याबद्दल काय वाटत असेल तें वाटो: पण आई-बाप मोठ्या मुलीचं लग्न जुळवण्याचा भार स्वतःवर घेतात, तेव्हां तिला दाखवतांना प्रत्येक वेळीं ते तिच्या मनाचं पावित्र्य नाहींसं करीत असतात असं मला तरी वाटतं. मोठाल्या मुलींनीं स्वतःच ठरवलेलीं लग्नं स्वतःच दोन तीन वेळां मोडल्याचीं उदाहरणंही मला माहीत आहेत. पण खरं म्हणजे त्याचा बाऊ करण्याचें काय कारण आहे ? पण मला तरी वाटतं, तशा वेळीं मुलगी फार तर चार पांच वेळां मन पालटील, पण पुढें तिला त्या सर्वांचाच कंटाळा आल्याशिवाय रहाणार नाहीं. आईबाप लग्न ठरवीत असतां मात्र क्वचित् एकापासून शंभरापर्यंत स्थळांचाही नकार घ्यावा लागतो. आणि प्रत्येक वेळीं मुलीचं मन भावी वराचीं व त्याच्याबरोबर करावयाच्या संसाराचीं संपूर्ण चित्रं काढून स्वतःच त्यांना आग लावीत असते. हीच का पावित्र्याची व्याख्या ?

मला आठवतं आहे, मी एका ठिकाणीं पसंत पडलें आणि मलाही मनापासून तें स्थळ आवडलं. त्यांनीं ‘ एका महिन्यांनीं नक्की उत्तर देतोंच; पण बहुधा होयच समजा ’ असं सांगितलं. माझा आनंद अंतर्यामीं उसळ्या घेत होता. माझ्या भावी यजमानाबद्दल मी सारखा विचार करीं. मला त्यांच्याबद्दल ओढा वाटूं लागला. एक दीड महिन्यांनीं त्यांचं पत्र आलं. माझी उत्कंठा तीव्र झाली. माझे कान प्रत्येक अक्षरासाठीं कसे आतुर झाले होते. अंतःकरण धडधडत असतां लाजेनें जरी मी स्वैंपाकघरांत गेलें, तरी आई बाबा बाहेर काय बोलत होतीं हें मला खडान् खडा ऐकूं येत होतं. अनिश्चिततेच्या हिंदोळ्या-वर माझं मन हेलकावे घेत होतं, तोंच “ नाहीं, जमत नाहीं, ” या वडलांच्या शब्दांनीं माझं हृदय विदीर्ण झालं. माझा गळा दाटून

आला. " मुलीचं नशीबच तसं " या आईच्या शब्दांनीं तर डोळ्यांतून अश्रू ओढून आणले. ते कुणाला दिसूं नयेत म्हणून मी चटकन् बाजूला झालें व तिथें मनमुराद रडलें. ' नाहीं ' या उत्तरानें मला किती दुःख झालं तें कसं सांगतां येणार ? त्याचीं कारणं जेव्हां मला कळलीं तेव्हां तर मला फारच वाईट वाटलं. हीच जर मी शिकली सवरलेली असते, तर मला त्यांच्याकडून नकार मिळालाच नसता. दिवसें दिवस माझी उदासीनता अधिक वाढत चालली. दाखवायचें नांव काढल्याबरोबर मला तिरस्कार येऊं लागला.

अशाच मनःस्थितींत वडलांनीं एक स्थळ आणलं; मीं पसंतही पडलें. पण माझ्या पसंती-नापसंतीबद्दल कोण विचार करणार ? माझं लग्न झालं. पण मला संसारांत गोडीच कशी ती वाटत नाहीं. अपरिचित अशा त्या व्यक्तीबद्दल जी मनानें एकदां भीति घेतली ती अद्याप कायम आहे. अशा स्थितींत त्या व्यक्तीबद्दल आदर आणि प्रेम मनांत उत्पन्न होऊन त्यांची वाढ केव्हां होईल ती होवो. मी आतां एक आज्ञाधारक गृहिणी आहें, पण त्याला कारण ती भीतिच. या भीतीलाच प्रेम व आदर म्हणायचं असलं तर म्हणावं; पण मला वाटतं ती स्वतःची फसवणूक आहे. ताई. हे पाहिलेस ना भीतीच्या मुंग्यानें पोखरलेले डोलारे ? हेच बरं आमचे सुखाचे संसार !

---

# रिकाम्या भांड्याचे निनाद !

आम्ही कॉलेजांत असतांना शीला नि चारुदत्त यांच्याबद्दल कितीतरी वदंता ऐकल्या होत्या. खरं म्हटलं, तर तीं दोघं अविवाहित. असलं त्यांचं दोघांचं एकमेकांवर प्रेम, तर आम्हीं त्यांची कां टवाळी करावी ? त्यांच्याकडे आमची काकदृष्टि कां वळावी ? पण केव्हांही तीं दोघं दिसलीं, किंवा ती एकटी दिसली, तरी आमच्या मनांत आधीं त्यांच्या ' रहस्याचा ' विचार यायचा, त्यांच्या निर्हेतुक कृतीही सहेतुक दिसायच्या आणि तो एक आमचा फुरसतीचा विषय होऊन राह्यचा.

शीलेची एक मैत्रीण कॉलेजांत असल्यानें, ती बहुधा आठवड्यांतून एकदां तरी वसतिगृहांत यायचीच. शीलेबद्दल तिच्या मागें आम्ही जरी वाटेल तें भकत असलों, तरी तिच्या तोंडावर तिला कांहींही विचारण्याचं धाडस आम्हांला होत नसे. आम्हीं तो प्रयत्नच कधीं केला नाहीं. आणि नेहमीं नाहीं तरी हाच प्रकार नाहीं का आपल्याला दिसत ? ज्या व्यक्तीबद्दल लोकवार्ता उठतात, तिच्याबद्दल इतर जन तास न् तास खल करीत बसतील; पण प्रत्यक्ष ती व्यक्ती दररोजच्या गांठींभेटींतील असूनसुद्धां प्रत्यक्ष खुलासा विचारण्याचं कोणाच्या मनांत येत नाहीं आणि तसं धाडसही होत नाहीं. बाकी तसं जर केलं, तर वास्तवाच्या स्फुटतेनें लोकवार्ता ठार व्हावयाची कदाचित्; मग बोलायला नि रिझायला विषय तरी कसे राहतील जगांत ? असो. शीलेच्याबद्दल असलेली वदंता खरी समजूनच आम्ही तिच्याकडे पहात असूं. मग तिला स्वतःला त्याची कल्पना होती किंवा नाहीं कोण जाणे !

होम क्लासमध्यें काम करूं लागल्यावर, शीलेबरोबर पूर्वी अस-

लेली कच्ची ओळख बरीच पक्की होऊं लागली. माझ्या वडलांचं घर दूर असल्यानें, त्यांनीं एका ओळखीच्या घरींच माझी राहण्याची सोय केली होती. मी क्लबांतल्या सारखीच, पंचवीस तीस रुपये दरमहा देऊन त्या घरीं राहात असें. आणि योगायोग पहा कसा तो! चारुदत्त व शीला दोघंही त्यांच्या ओळखीचीं असल्यानें तीं नेहमीं तेथें येत असत. लोकवार्तेचे संस्कार माझ्या मनावरून नष्ट झालेले नव्हतेच. आणि खरं सांगायचं, तर स्त्री ही अखिल स्त्री-पुरुषांच्या कुतूहलाचें केंद्र आहे. तरी स्त्रीची बदनामी पुरुषांपेक्षां स्त्रीच अधिक कठोरतेनें करते. स्वजातीवरच तिची भेदक दृष्टि अधिक खिळलेली असते. आम्ही सर्वजण एकत्र बोलत बसलों, कीं माझी भेदक दृष्टि चारुदत्त व शीला यांजकडे रोखून पाहात असे. चारुदत्तांच्या विनोदी स्वभावांत, क्वचित् दिसणारा पोरकटपणा व क्वचित् बुद्धीची प्रखरता, यांचं कांहींसं विलक्षण मिश्रण झालेलं होतं. उलट शीलेंत बुद्धीची प्रखरता व विनोद असला, तरी चिडकेपणा हा तिचा एक विशेष होता. त्यामुळें त्या दोघांच्या वादविवादाचं पर्यवसान हटकून चारुदत्तांच्या विनोद–हास्यांत व शीलेच्या चिडण्यांत होई.

हीं प्रेमाचीं भांडणंच आहेत, असं प्रथम माझ्या दूषित दृष्टीला वाटे. पण पुढें कोणाशींही विनोदानें बोलण्याचा चारुदत्तांचा स्वभाव मला कळून आला. एवढंच नव्हे, तर कधीं कधीं मलाही ते चिडवूं पहात; तेव्हां माझं मन मला सांगूं लागलं "छे, त्यांचं शीलेवर 'तसलं, प्रेम नाहीं. ते तिच्याशीं बोलतात, तसंच सर्वांशीं बोलतात."

कांहीं दिवस निघून गेले. मला वाटलं, चारुदत्तांचं शीलेवर प्रेम नाहीं. नुसती मैत्री असेल म्हणावं, तर तीही विशेष नाहीं. ते सर्वांशीं चांगले वागतात. पण माझ्याशीं ते अधिक प्रेमळपणानें वागतात का? माझं मन विचार करूं लागलं. वस्तुस्थिति काय असेल ती असो. माझ्या मनानें मात्र आपलं

आपल्याला ' होय ' असं उत्तर घेतलं खरं. माझ्या नित्याच्या व्यवसायांतील वेळ सोडला, तर पुष्कळसा वेळ चारुदत्तांशीं बोलण्यांत जाई. इतर कामांत असतांनाही, मी न कळतां त्यांच्याबद्दल कांहीं तरी विचार करीत असें; याचं मला राहून राहून आश्चर्य वाटे.

शीला नि मी बरोबरीच्या. मी होम क्लासमध्यें काम करायला लागल्यापासूनच आम्ही बरोबर फिरायला जात होतों. शीला चारुदत्तांच्याबद्दल आपणहून क्वचितच बोले; आणि बोलली, तरीही त्यांच्या विचारसरणीवर, पोरकटपणावर व विनोदावर अगदीं तुटून पडत असे. तिच्या अंतःकरणाचा ठाव घ्यायला मी किती उत्सुक होतें ! प्रथम त्यांच्याबद्दल तिचं असं बोलणं मला अगदीं वरवरचं वाटे. पण पुढें नेहमींचंच तसं पाहिलं, तेव्हां शीलेला चारुदत्तांविषयीं ' विशेष ' असं कांहीं वाटत नाहीं, याबद्दल माझी खात्री झाली. मला या खात्रीनें न कळतां अंधुक, पण किती समाधान वाटलं ! तें कां, हें मी सांगू शकत नाहीं. मग चारुदत्तांचं अंतःकरणही अजून कोरंच असेल का ? बहुधा नसेल. शीलेचं तर चारुदत्तांवर प्रेम नाहीं. त्या दोघांच्या बोलण्याचा शेवट भांडणांत होतो. पण मग तीं पुनः कशीं एकमेकांशीं बोलतात ? किंवा शीलेचं नसलं तरी चारुदत्तांचं कदाचित् एकांगी प्रेम असेल; कारण त्यांचा ठाव मला कोठें लागला आहे ? त्यांचा हा भांडणाचा वरवर देखावा तर नसेल ? हें विरोधी प्रेम तर नसेल !

माझ्या समाधानाला धक्का बसे. लगेच वाटे, छेः. अशा सतत विरोधाच्या धारेनें प्रेमाची खांडं खांडं होऊन जातील. हें प्रेम नाहींच. हा एकमेकांचा उपहासच चालत असावा. नाहींतर, चारुदत्तांना शीलेच्या गर्वाचा नूर उतरावयाचा असेल. शीला आहेच गर्विष्ठ. मी दचकलें. शीला आहेच गर्विष्ठ, आणि चारुदत्त आहेतच सद्गुणी; कां बरं ही तुलना करायला लागलें ? चारुदत्तांना चांगलें म्हण-

ण्यांत मला कां विशेष समाधान वाटलं ? कां तें मला नीटसं कळलं नाहीं. मग मीं स्वतःशीं म्हटलं, " चांगल्याला चांगलं नि वाईटाला वाईट कोणीही म्हणेल. त्यांत कांहीं म्हणणाराचा संबंध असावा लागतो थोडाच ! "

काय भानगडी झाल्या कोण जाणे ! पण शीला अगदीं क्वचितच आमचेकडे येऊ लागली. आणि कां कोण जाणें, चारुदत्त आमचे घरीं असतां, ती यदाकदाचित् आली तर मलाही तितकंसं बरं वाटत नसे ! तिनें यावं, पण चारुदत्त नसतील तेव्हां किंवा चारुदत्त असतांना ती आली, तरी चारुदत्तांनीं तिच्याशीं फार मनमोकळेपणानें बोलूं नये. ते तसं बोलायला लागले, कीं मला एकप्रकारें हुरहुर लागे, व विषाद वाटे. माझ्यापेक्षां चारुदत्त शीलेशीं अधिक मोकळया मनानें बोलताहेत कीं काय ? असा संशय येई. त्याबद्दल मला चारुदत्तांचा अगदीं मनापासून राग येई. शेवटीं विवेक असंही म्हणे, कीं चारुदत्त तुझे कोण ? ते शीलेशीं अगदीं मोकळेपणानें बोलले समज, तरी त्यांत तुझं काय खर्च होतं ! तुला त्यामुळें कां वाईट वाटतं ?

माझ्या प्रश्नाचं उत्तर निश्चित सांपडलं नाहीं, तरी चारुदत्तांची मैत्रीण मीं असावीं, माझे ते मित्र असावेत, आम्हीं मनमोकळेपणानें बोलावं, तो माझाच हक्क आहे, असं मात्र मला वाटूं लागलं खरं. शीला नसली म्हणजे मला असंही वाटे, कीं चारुदत्त अगदीं विशेष मनमोकळेपणानें माझ्याशीं बोलतात. मला त्यांत अभिमान वाटे आणि काय गंमत आहे पहा ! अर्थाअर्थीं कांहीं संबंध नसतां मला सुद्धां माझ्या वैयक्तिक बाबतींत त्यांनाच सल्लामसलत विचारावीसें वाटे. माझ्या मनाला लागणारी कांहीं गोष्ट घडली, कीं, मला मैत्रिणींशीं बोलावंसं वाटतच नसे. मी चारुदत्तांशीं बोलून माझं मन हलकं करी. मला कांहीं थोड्या

मैत्रिणी नव्हत्या. पण मैत्रीला पुरुषाचं मन अधिक दिलदार असतं असं मला वाटे माझं चारुदत्तांशीं असं बोलणं बहुधा आसपास कोणी येणार नाहीं, अशाच वेळीं होई; कारण ज्या घरीं मी राहात होतें, तिथें बरीच माणसं होतीं. बसणं, उठणं, गप्पा या एकाच दिवाणखान्यांत होत असल्यानें, बहुधा माणसं नाहींत अशी वेळ दिवसांतून फारच थोडी असे. चारुदत्तांशीं मी असं कांहीं बोललें, कीं, ते खुल्या दिलानें सल्ला देत; सांत्वन करीत. माझं भुकेललं मन, थोडकीं दुःखंही मोठीं करून, मला त्यांच्याशीं बोलायला लावी. त्यांना माझ्याबद्दल ‘ कांहीं तरी ’ वाटूनच ते माझं सांत्वन करतात, असं मला वाटे. मग ती माझी फसवणूक होत होती कीं काय कोण जाणे !

चारुदत्त कोणाबद्दल उगीच वाईट बोलत नसत. त्यामुळें त्यांच्या मनाचा अंदाज मला एवढा होता, कीं त्यांचा उमदा स्वभाव आहे. चारुदत्त हेच माझे परम मित्र, असं मी मनानं समजत असें. मलाही ते परम मैत्रीण मानीत असतील, असं मला वाटे. कदाचित् माझ्या आंधळ्या मनानें तशी समजूत करून घेतली असेल. कधीं कधीं चारुदत्त माझ्याशीं औदासीन्यानें वागतात, असा मला भास होई. मला त्यामुळं किती वाईट वाटे ! माझा राग येई, त्यांचाही राग येई. मीही त्यांच्याशीं अबोला धरीत असें. पण त्या अबोल्यांत मुळींच जीव नसायचा. सारखं मनांत यायचं, कीं चारुदत्तांनीं मला विचारावं, “ तुम्हीं बोलत कां नाहीं आज ? ” आणि चारुदत्त अशा वेळीं म्हणतही, “ कां ? आज लहर आली आहे वाटतं न बोलायची ? ” मला वाटे, हें त्यांनीं सर्वांदेखत विचारूं नये. मला निराळं निराळ्या ठिकाणीं त्यांना नाहीं का विचारतां येणार ? त्यांनीं तसं विचारलं कीं मी त्यांच्यावर खूप राग काढीन.

खरोखर, त्यांनीं निराळ्या ठिकाणीं माझी लहर फिरण्याचं कारण विचारलं असतं, तर मी त्यांच्यावर काय म्हणून राग काढला

असता ? त्यांनीं काय माझं केलं होतं ? पण त्यावेळीं माझं मन वेडं झालं होतं. मला वाटे, " तुम्हीं माझ्याबद्दल उदासीनता दाखवतां " असं म्हणून मी सपाटून रागावेन.

त्याच सहामाहींतील गोष्ट. क्लासची सहामाही संपल्यानें, मला एक दोन दिवसांत घरीं जायचं होतं. ' हं, मग तुम्ही जाणार म्हणतां उद्यां ! आपण सगळीं किती वेळ गप्पा मारीत होतों दररोज नाहीं ! या महिन्यांत एक मेंबर गेल्यानें चुकल्यासारखं होईल आम्हांला ' चारुदत्त म्हणाले. मला वाटतं ही मेंबराची सबब पोकळ आहे. ' मी ' जातें म्हणून यांना वाईट वाटत असावं.

( २ )

सबंध सुटींत मी घरीं होतें. पण सारखी हुरहुर लागलेली असे. केव्हां सुटी सरतेसं झालं. लहानपणीं बोर्डिंगांत म्हणून दूर व आतां नोकरीनिमित्त दूर. यामुळें माझ्या मित्रमैत्रिणींपेक्षां घरची माणसें मला किंचित् परकींच वाटत. कांहीं दिवस घरीं बरं वाटलं, तरी शेवटीं माझ्या उद्योगाच्या गांवाची मला लवकर ओढ लागे. माझे वडील खाऊन पिऊन सुखी; पण आमच्या प्रांतांत मीच काय ती शिकलेली, म्हणून मला बरेंच महत्त्व होतें. साहाजिक माझ्या वडलांना एखादा आय. सी. एस. आपल्या मुलीला मिळेल, निदान असाच कोणी बडा सरकारी नोकर मिळेल अशी आशा होती. तें तसा शोधही करीत होते; पण माझी हुरहुर कां वाढत होती, कोण जाणे !

सुटी सरली. मी पुनः कामावर रुजू झालें. पण मी आलें, त्याच दिवशीं मी शैलेला आणि चारुदत्तांना बोलतांना पाहिलं. माझं मन दुखवलं गेलं. चारुदत्तांनीं माझी नेहमीं-प्रमाणें विचारपूस केली. पण त्यांचं व शैलेचं सख्य महिना-भरांत वाढलं कीं काय असा मला संशय आला. त्यामुळें वाईट

वाटायला लागलं ! चारुदत्तांचं मन मजकडे ओढून घेण्याचा मी प्रयत्न करूं लागलें.

दिवसांमागें दिवस गेले. अलिकडे लोक माझ्याकडे पाहून हंसतात असं मला वाटूं लागलं. जरी आमचं एकमेकांवर प्रेम असलं, तरी लोकांना तें कळावं, अगर त्यांनीं तसं म्हणावं, या गोष्टींची मला चीड येऊं लागली. मी हजार वेळां चारुदत्तांजवळ तक्रार केली ! ते म्हणत, " तसं नाहीं. मग तुम्ही कशाला लक्ष दतां लोकांकडे ? "

या गोष्टीलाही कांहीं दिवस झाले. चारुदत्तांना माझी ओढ लागली आहे अशी माझी खात्री होती. त्यामुळें वडलांनीं सुचविलेल्या स्थळाला मीं नकार दिला. माझ्या मनाला सुद्धां असं कांहीं नक्की सांगतां येत नव्हतं, कीं मी चारुदत्तांकरतांच नकार दिला म्हणून ! पण वडलांचं पत्र वाचीत असतांना प्रथम मनांत व्यक्ति आली ती चारुदत्त, यांत शंका नाहीं.

शीलेच्या साध्या राहणीबद्दल चारुदत्त चांगले उद्गार काढीत; एवढंच नव्हे, तर असं सुद्धां म्हणत, कीं " शिकलेल्या मुलींत सामान्यतः छक्केपंजे फार असतात. या मुलींत मात्र अगदींच नाहींत " मला त्यांचे शीलेबद्दल स्तुतीचे उद्गार आवडले नाहींत, तरी माझ्यांत मी बदल करूं लागलें.

कॉलेजांत असतांना दिवसांतून तीन वेळां वेणा घालणं, तोंड धुणं, पॉवडर लावणं, ही आमची आवडती दिनचर्या. सकाळीं वेणी निराळी, दुपारीं निराळी, संध्याकाळीं निराळी; तसेंच वेणींतील फुलेंही तीन वेळां तीन तऱ्हांचीं. हेअरपिन्सच्या तऱ्हा, ब्लाऊझेसच्या तऱ्हा, साडीच्या ( आम्ही ' लुगडें ' म्हणत नसूं ) तऱ्हा व विवाह, हे आमचे सामान्यतः बोलण्याचे विषय असत. माझ्या मैत्रिणींत एक श्रीमंत मैत्रीण होती. तिचे हे बाह्य उपचार आम्ही पूर्णपणें उचलले

होते. तिचं एका आय. सी. एस.शीं लग्न झालं. ती दिसायला सामान्यच होती. पण आय. सी. एस.ची ती बहीण व आय. सी. एस. त्याचा मित्र, म्हणून जमलें.

कॉलेजमधून बाहेर पडल्यावर किती दिवस कटु व्यवहाराची झळ लागलेली नसते. कल्पनेच्या भराऱ्या त्या वेळीं असीम असतात. मलाही आय. सी. एस. मिळण्याबद्दल आशा नव्हती असं नाहीं; कारण मी आमच्या प्रांतांतील एकुलती एक ग्रॅज्युएट होतें. त्याच ऐटींत मीं वागत होतें. पण आतां मात्र चारुदत्तांनीं शीलेच्या साधेपणाची स्तुति केल्यापासून, माझ्या वागण्यांतील ऐट मी एकदम सोडली. एवढंच नव्हे, तर साध्या राहाणीचा मुखानेंही मी पुरस्कार करूं लागलें. मला साधंसुधं राहणं अंतरंगांत किती जड जात असे, हें माझं मलाच माहीत. पण मी शीलेची प्रतिमा होऊं पहात होतें.

माझ्यांतील हा फरक सर्वांना कळत होता. लोक तरीं काय पहा ! ते म्हणतात, " हें तुमचं वागणं अंतरंगापासूनचं वाटत नाहीं. याचा कर्ता करविता धनी निराळाच वाटतो. " त्यांचं म्हणणं खरं असलं, तरी मला राग येई. मी माझं खरं अंतःकरण पूर्णपणें दडवण्याचा प्रयत्न करीं. पण चारुदत्तांबद्दल वाटणारी भावना मीं किती दडवली तरी ती दडत नसे. मी चारुदत्तांकडे जात येत असें. चारुदत्तांच्या ओळखीचे त्यांच्याच वयाचे एक गृहस्थ चारुदत्तांकडे बरेच वेळां येत असत. त्यांचं नांव दामोदरपंत. त्यांनीं सुद्धां माझं मन ओळखलं होतं. नंतर माझ्या साध्या राहणीचा अर्थही त्यांनीं असाच कांहींसा चारुदत्तांकडे भिडवला, असं मला कळलं. बरोबरच आहे. चोरालाच चोराचीं पाऊलं उमगतात. त्यांचंही असंच कोणा पोरीवर मन असल्याचं मला ऐकून माहीत होतं ! असो.

वडलांनीं आणलेल्या स्थळाला मी नकार दिला. हें वडलांना आवडलं नाहीं. माझ्या या नकाराची बातमी वडलांना मी जरी

पोस्टामार्फत दिली, तरी तीच उलट माझ्याकडे आली, तेव्हां मात्र लोकांच्या सांगोवांगीनें कसे बातम्यांना कान फुटतात कोण जाणे ! मी ज्या घरीं रहात असें, तेथल्या लोकांनींही मला विचारलं, कीं " तुम्ही वडलांना नकार कां दिलात ? " मी म्हटलं, " मला लग्नच करायचं नाहीं. इतकं शिकल्यासरसं पांच सहा वर्षं मी काम करणार आहें. आणि मग सगळं." हें खरं उत्तर होतं का माझं ? पांच सहा वर्षं काम करायला लागणारं खंबीर मन माझ्या ठिकाणीं राहिलंच नव्हतं. तरुण कुमारिकांना जो भावनारोग जडतो, त्यानं माझं मन मरण्यासारखं पोकळ केलं होतं.

पण या बाबतींत लपवाछपवी हा साहजिक मनोधर्मच आहे, व लोकांनाही तें उत्तर पटत नाहीं. त्यांतून ते तिसराच निष्कर्ष काढतात, हीही मोठी विचित्र गोष्ट आहे. मी वडलांना " नाहीं " सांगितलं, याला कारण माझं मन चारुदत्तांवर आहे, असं कांहींनीं हंसत थट्टेंत मला दर्शवलंसुद्धां. जणुं हें ' कुभांड ' माझ्यावर रचलं आहे, अशा थाटानें मी त्या वेळीं चिडलें भांडलें; पण अंतःकरणांतला परमेश्वर कांहीं निराळंच बोलत होता.

माझ्या मनाला लागलेल्या चिंतेनें माझ्यावर इतका कांहीं वाईट परिणाम झाला, कीं माझा निव्वळ हाडांचा सांपळा शिल्लक राहिला. कॉलेजमध्यें असतांना धष्ट पुष्ट असलेलं माझं शरीर पार वाळून गेलं. माझं अन्न तुटलं. जें तें मला विचारूं लागलं कीं अशा कां दिसतां अलिकडे ? एका म्हाताऱ्या फटकळ बाईनें तर मला म्हटलं, " अग, लग्नासाठीं वाळतात हो या मुली. लग्न कर, कीं होशील चांगली ! " तिच्या या मनकवडेपणाचा अस्सा राग आला होता मला ! पण जाऊं दे.

## ३

एक दिवस भर उन्हाची वेळ. मी चारुदत्तांकडे गेलें त्यांना मी माझं अंतरंग उकलून दाखवलं. ते अगदीं आश्चर्यानें स्तंभितच झाले ! ते म्हणाले

" मला तुमच्याबद्दल सहानुभूति वाटते. पण क्षमा करा. तुम्हांला माझ्याविषयीं वाटतं तसं मला तुमच्याबद्दल मुळींच कांहीं वाटत नाहीं. " धरणी दुभंग होऊन मला पोटांत घेती तर किती बरं झालं असतं ? माझ्या भावनांचा अपमान झाला. एखाद्या बाईनें आपलं हृदय एखाद्या पुरुषाजवळ उकलून दाखवावं व त्यानें आपलं फत्तरासारखं निर्विकार हृदय दाखवावं ! असा प्रसंग माझ्या शत्रूवर सुद्धां येऊं नये ! काय मनाची तडफड व तळमळ होते ! तें मी शब्दांत सांगूं शकत नाहीं. पण बायांनो ! त्याचा कटु अनुभव तुम्हांला नको, एवढं खरं. निराशेनें उत्पन्न झालेल्या त्वेषानें मीं म्हटलं, " चारुदत्त ! तुम्ही विश्वासघातकी आहांत. इतके दिवस मी तुम्हांला अत्यंत सद्गुणी समजलें होतें. वेळोवेळीं माझ्याशीं ज्या आपुलकीनें व सहृदयतेनें तुम्ही वागत आलां, ती फसवणूक होती म्हणायची ? माझ्याबद्दल दाखवलेल्या ममत्वाच्या पोटीं विष होतं तर ? तुमची अशी भ्रमरवृत्ति असेल अशी मला कल्पनाही नव्हती. एकाद्या स्त्रीला आपलीशी करून, तिनें दाखविलेल्या जिव्हाळयाचा आनंद बेजबाबदारपणें भरपूर लुटायला तुमच्या मनाला दिक्कत कशी नाहीं वाटली ? मीच तुमच्या वागणुकीनें फसलें, असं नाहीं. लोकांना सुद्धां तुमच्या वागण्यांत माझ्याबद्दलचं प्रेम दिसत होतं."

एवढ्या बोलण्यानंतरही चारुदत्त माझ्यावर रागावले नाहींत. उलट शांतपणें ते म्हणाले, " तुम्ही आपली कांहीं तरी चुकीची समजूत करून घेतली आहे. जगाचा अनुभव तुम्हांला फार कमी आहे, त्यामुळेंच तुमच्या मनाचा हा ग्रह झाला आहे. मी जसा तुमच्याशीं तसाच कोणत्याही स्त्रीशीं अगर कोणत्याही पुरुषाशीं दाक्षिण्यानें वागतों. त्याचा अर्थ जर म्ही ' प्रेम ' असा केला असलात तर माझा नाइलाज आहे. तुम्हांला मात्र मजबद्दल तशा तऱ्हेचं प्रेम वाटत होतं, हें मला कितीक जणांनीं सांगितलं आहे.

एवढंच नव्हे, तर माझं मन अगदीं निर्विकार असल्यामुळें, तुमच्या एकांगी प्रेमाची मजजवळ त्यांनीं थट्टाही केली. कारण माझं मित्र-मंडळ मला पूर्ण ओळखतं. मी ज्या दाक्षिण्यानें इतर स्त्रियांशीं वागतों, त्याचा स्त्रियांच्या मनावर विकृत परिणाम होतो, ही गोष्ट तुमच्याच बाबतींत नव्हे, तर अनेक स्त्रियांच्या बाबतींतही अशीच घडली आहे, याचं मलाही वाईट वाटतं; पण त्यांची त्यांनींच परीक्षा करून, माझा खरा स्वभाव समजून घेतला. त्यामुळें तुम्ही आतां जो मानसिक त्रास करून घेतां, तो त्रास त्यांना झाला नाहीं. ''

चारुदत्तांचं बोलणं नेहमीं निरुत्तर करणारं असे. मी विचार केला, कीं ' खरंच. शीलेशींही हे असेच वागत. त्याबद्दल आपल्यालाच कांहीं वाहीं वाटूं लागलं. पण शीलेला कधींच वाटलेलं दिसलं नाहीं. '

चारुदत्त म्हणाले, '' तुम्ही मला एक तरी गोष्ट अशी दाखवा, कीं जी मी तुमच्यापाशीं इतरांच्या देखत बोलूं शकलों नसतों. तुम्ही नाना तऱ्हांच्या निंदा मजजवळ करीत असतांही, मी गैरहजर पक्षाची बाजू उचलून सौम्यपणें तुमचा स्वभाव पालटण्याचा प्रयत्न करीत होतों. कारण निंदक स्वभाव मला आवडत नाहीं. ''

एकूण चारुदत्तांना मी निंदक वाटतें तर ? बाकी हें कांहीं खोटं नाहीं. त्यांनीं विनाकारण कोणाबद्दलही अनुदार उद्गार काढले नाहींत. त्यांचा बोलतांना कधीं तोल गेला नाहीं. यामुळेंच मला त्यांना सल्ला विचारावा, असं प्रथम वाटूं लागलं. या सत्य स्थितीच्या आठवणींमुळें जरी मनांतल्या मनांत मी विरून गेलें, तरी माझी निराशा केल्यामुळें मला चारुदत्तांचा राग आला होता, यांत शंका नाहीं. माझ्या स्वाभिमानाचा अपमान झाला होता. त्यामुळें त्यांचं हें बोलणं पटूनही मला त्यांनीं फसवलं ही भावना कायमच राहिली. कांठाशीं असलेल्या तराफ्यांत पाय टाकायला जावं तों त्यानें जणुं मानेला हिसडा देऊन बाजूला व्हावं, आणि

उतारू पाण्यांत पडावा तशी माझी स्थिति झाली होती.

मी त्यांना म्हटलं, " छान ! एकूण मलाच नाहीं, अशा अनेक पोरींना तुमच्या वरपांगी देखाव्यानें तुम्ही फसवलंत वाटतं ? तुम्ही इतके नीच वृत्तीचे असाल, अशी मला कल्पना नव्हती. माझं मन आणि देहसुद्धां काळजीनें पोखरलीं गेलीं. या सर्वांला तुम्ही जबाबदार आहां. ही जबाबदारी तुम्हांला टाळतां येणार नाहीं. आणि टाळणार असाल, तर माझा स्पष्ट ग्रह हाच झालेला आहे, कीं तुमचं शीलेशीं लग्न ठरलेलें असावं. माझ्या मनांत द्वेष, संताप यांचं थैमान सुरू होतं. "

चारुदत्त म्हणाले, " उगाच शब्दाची उधळमाप कशाला करतां ? तापटपणानें तुम्ही माझ्याबद्दल वाटेल तसे उद्गार काढलेत, तरी मी रागावणार नाहीं; पण शीलाबाईंना यांत निष्कारण कशाला गोंवतां ? त्यांच्याबद्दल मला तुमच्यापेक्षां निराळं कांहीं वाटत नाहीं. आणि मी तुम्हांला असं सांगतों, कीं तुम्हीं आतां कांहींच बोलूं नये. मागची आठवण करून आतांपर्यंतच्या तुमच्या न् माझ्या बोलण्याकडे नीट निरखून पहा; म्हणजे तुम्हांला तुमची चूक कळून येईल."

माझी चूक दाखवली कीं मला नेहमीं राग येत असे. त्यामुळें कित्येक वेळां सपशेल निराळा आंव आणायला मी तयार असें. मी एकदम त्यांना म्हटलं " अस्सं होय. तुमचे शब्द नाहींत तरी तुमचा चेहरा, तुमच्या डोळ्यांतील चमक, तुमचं विशिष्ट तऱ्हेचं हंसणं आणि मार्दव यांचा काय अर्थ होता ? अगदीं स्पष्ट अस्साच अर्थ होता ! आणि असेच जर तुम्ही सगळया स्त्रियांशीं वागत असलां, तर तुम्हांला दुरून दुसऱ्याच्या प्रेमाचा आस्वाद लुटणारे, फसवे लुटारूच मी समजतें. मलाही तुमचीं हीं बिंगं चव्हाट्यावर–"

मी आणखीही कांहीं बोलणार होतें; तोंच दामोपरपंत दारांत उभे असलेले मला दिसले. मला एकदम कसंसंच झालं. त्यांनीं हें

सगळं ऐकलं असेल काय ? भय, लज्जा, चिंता, अपमान, सूड वगैरे अनेक भावना त्यावेळीं माझ्या चेहऱ्यावर खात्रीनें मुद्रित झालेल्या असाव्यात. त्यामुळेंच तेही स्तंभित झालेले निदान मला वाटले. कसंही असो. उसनं हंसून पांच मिनिटं उगीच इकडे तिकडे बोलून मी उठून गेलें.

( ४ )

त्या दिवशीं माझ्या मनावर इतका विलक्षण परिणाम झाला, कीं डोकं दुखून मला तापही आला. लोक म्हणतात, मी तापांत कांहीं कांहींच बडबडलें. काय बडबडलें, त्याचीच मला भीति वाटूं लागली, इतका त्रास मला झाला होता ! पण लवकरच त्या तापांतून मी उठलें. मनुष्य रागाचा भर ओसरेपर्यंत स्वतःच्या दोषांकडे पाहूंच शकत नाहीं. पण तो राग ओसरला, कीं अंतर्मुख दृष्टीनें मनाच्या काना-कोंपऱ्यांतील दोषही त्याला मोठे दिसूं लागतात. रागानें पेटलेली ज्वाला परवडते पण पश्चात्तापानें धुमसणारें मन असह्य होतें !

मला सर्व कांहीं स्वच्छ दिसूं लागलं. कॉलेजमध्यें मुली मला म्हणत, ' काशी, तूं संशयी आहेस, ' ' चंचल आहेस. ' ' तूं भावनाचे भरांत वाहून जातेस ' ' तापट आहेस ' ' एकदां भूत शिरलं तुझ्या अंगांत कीं तूं खऱ्याचं खोटं सुद्धां करशील. ' ' तूं ढोंगीं आहेस. ' ' तुझं वागणं कृत्रिम वाटतं.' ' तूं होस हो ठोकणारी आहेस. ' रागांत अगर लोभांत निरनिराळ्या वेळीं माझ्या मनाचं मैत्रिणींनीं केलेलं असं पृथक्करण मला स्पष्टपणें आठवलं. त्यांनीं दाखवले त्यापेक्षां हजार पटींनीं अधिक दोष माझ्या अंगांत होते.

पश्चात्तपाचं धुमसणं किती तरी दिवस चालूं होतं. त्या भरांत मीं नाना तऱ्हांनीं निश्चय केले. एकदां मनानें विवाह झाल्यावर पुनः विवाह करून आपलं पावित्र्य नष्ट करायचं नाहीं; आजन्म अ-विवाहित राह्यचं असं मी ठरवलं. मित्र व मैत्रिणी जोडायच्या नाहींत.

असंही ठरवलं. मी तुटक व अबोल बनत चाललें व त्यामुळेंच 'मी ढोंगी आहें. कामापुरती गोड वागणारी आहें.' असा माझ्याबद्दलचा ग्रह वाढत चालला.

हवेंत उडणारा पतंग जसा वाऱ्याच्या थपडांनीं वाटेल तसा भरकटूं लागतो, तशीच असहाय व नाजूक अवस्था माझ्या मनाची झाली. माझ्याबद्दल कोणीही जे कांहीं चांगले वाईट उद्गार काढीत, त्यांबद्दल माझं मन विचार करीत राही. कारण माझ्या मनालाच माझी ओळख पटली नव्हती. 'मी कशी आहें ?' याबद्दल विचार करतांना तें अस्थिर वावडीसारखं गटंकळया खात राही.

माझ्या मनाची अशी अवस्था झाली, त्यावेळीं माझ्या मनाला एका आठवणीनें नेहमीं त्रास होई. दामोदरपंतांना आमच्या भांडणाचा इतिहास यथासांग कळला असावा, त्यांनीं निदान त्या दिवशीं तो अर्धवट, ओझरता ऐकला असावा, असं मला वाटे. त्यामुळें माझं मन एका दृष्टीनें आत्मसमर्थन कसं करावं या तयारींत होतं. आपण होऊन त्यांच्यापाशीं बोलायचं नाहीं, असं मीं ठरविलं होतं. पण कांहीं झालं, तरी स्त्रियांचं मन अधु असतं. अर्धवट गोष्टीचा पुरा खुलासा करण्यासाठीं तें अधीर होतं. माझी अधीरता व दामो-दरपंतांवर आलेला प्रसंग यांची एकाच वेळीं सांगड कशी बसली कोण जाणे ! पण त्यावरूनच मला असं वाटतं कीं नशिबाचे धागे दोरे मोठे विलक्षण असतात !

( ५ )

दामोदरपंतांचं ज्या मुलीवर प्रेम होतं, तिची व आपल्या मित्राची ओळख एकदां दामोदरपंतांनीं करून दिली. पुढें त्याचं पर्यवसान त्या मुलीनें दामोदरपंतांना सोडून त्यांच्या मित्राशींच लग्न करण्यांत झालं. दामोदरपंतांच्या आयुष्यांतील ही कथा आम्हांला माहीत होतीच. पण निराशेमुळें चिडून जाऊन खुल्या मनानें हा इतिहास आम्हांला

ते ऐकवूं लागले. एकदां असंच बोलण्यावरून बोलणं निघतां, त्याचा शेवट त्यांनीं असा केला, कीं 'अहो, बायका मोठ्या धूर्त ! कोणाला जाळ्यांत पकडतील कोणाला ठोकर देतील याचा पत्ता नाहीं.' आणि ते माझ्याकडे पाहून असे कांहीं हंसले कीं मला वाटलं, ह्या वाक्याचा संबंध त्या आमच्यांतील अर्धवट ऐकलेल्या भांडणाशींच असावा ! एवढा संशय यायचाच अवकाश होता. मी अथपासून इतिपर्यंत 'चारुदत्तांची आचरटपणाची वागणूक व शेवटीं कानावर हात ठेवून मोकळें होण्याची प्रवृत्ति' हें सगळं कांहीं सांगितलं. माझी बाजू दृढ होईल, अशा रीतीनें त्यांच्यापुढं वर्णन केलं. हें माझ्या मनानेंच उभं केलेलं साम्राज्य नव्हतं, एवढंच नव्हे, तर चारुदत्तांमुळें माझं शरीर व मन कायमचं खंगलं, इतके बेजबाबदार ते आहेत असं मीं सांगितलं व म्हटलं, 'सांगा आतां कोण फसव्ये ते ?'

दामोदरपंत चारुदत्तांचे मित्र. ते निर्विकारपणें एवढं मात्र म्हणाले, "चारूचं कोण जाणे ! पण काशीताई, तुमच्या मनाचा ठाव मात्र आम्हांला तुमच्या वागण्यावरून केव्हांच लागला होता !" या त्यांच्या वाक्यानें मी जास्तच करपून गेलें. एकूण माझे मींच आशांचे मायावी किल्ले बांधून मोडले तर ! विषण्ण मनःस्थितींत बरेच दिवस गेले. या सबंध सहामाहींत माझ्या विकल मनाची अंधुकही कल्पना माझ्या वडलांना नव्हती. ती सहामाही संपून सुटीसाठीं मी घरीं गेलें. वातावरण बदलल्यानें मनाला किंचित् बरं वाटलं.

६

कादंबऱ्यांतून अशीं वर्णनं आपण वाचतों कीं नायिकेवर संकट यायचं, तेवढ्यांतून नायकानें तिची सोडवणूक करायची व पुढें नायकनायिका एवढ्या संकटनिवारणाचं सूत हातीं धरून, प्रेमरूप स्वर्गाला पोहोंचायचीं. माझ्या आयुष्याची अशीच कादंबरी होईल,

असं कोणीं भाकित केलं असतं तर मीं त्याची चेष्टाच केली असती. पण आतां मला तसं म्हणवत नाहीं. पुरुषाच्या प्रेमळपणाची व जिव्हाळायची माधुरी मीं चाखली होती. त्यामुळें माझ्या मनांत मीं किती निश्चय केले, तरी त्याच वेड्या इच्छेनें ते विसरून गेलें. 'कोणत्याही पुरुषाशीं मैत्री करणार नाहीं' हा निश्चय करीत करीतच, एकीकडे न कळतां मी दामोदरपंतांच्या पाशांत सांपडत होतें. चारुदत्तांच्या बाबतींत झालेल्या निराशेनें माझं मन करपलं होतं; पण दामोदरपंतांच्या सहानुभुतीनें त्याला आपोआपच पुनः पालवी फुटूं लागली.

वेलीची उपमा स्त्रीला देतात, म्हणून आम्ही एकेकाळीं चेष्टा करीत असूं. पण त्याची सत्यता आतां मला पटत होती. एका तरूचा आश्रय नाहींसा झाल्यानें मी हताश होऊन पडलें होतें. वेली जें सांपडेल त्याचा आसरा घेऊं पाहते. त्या भोंवतीं आपल्या कोमल अंकुरांचे पाश टाकीत जाते. न कळतां माझी स्थिति अशीच होऊं लागली. या कोमल, पण रेशमासारख्या बळकट पाशांना तोडणारा चारुदत्तांच्या सारखा तरुही विरळाच. एकादी दैवीच आपत्ति आली, विचित्र विधिघटना झाली तरच हा पाश तुटायचा तसंच इथं झालं. दामोदरपंतांचीही आयुष्यांत निराशा झालेली; माझीही झालेली या दृष्टीनें आम्ही समानशील होतों. माझं चित्त आंवरलं तरी ते त्यांच्याकडे धांव घेत होतं. मला दामोदरपंतांच्या ठिकाणीं किती तरी दयाळूपणा व प्रेमळपणा दिसत होता. ते उद्योगी होते. संपत्तीनें बऱ्यापैकीं होते. त्यांना नोकरीही होती. ते तडफीचे होते, असा माझा त्यांच्याबद्दल ग्रह होता.

सुटींत माझी प्रकृति चांगली झाली होती. ती तशीच कायम टिकवावी या दृष्टीनें मी नियमानें पहांटे फिरायला जात असें. कधीं एकटीनें जायचा कंटाळा येई, त्यामुळें कोणी तरी माझ्याबरोबर मी

घेत असे. एक दिवस पहांटेच्या वेळीं दामोदरपंतांना फिरून परत येतांना मीं पाहिलं. मीं म्हटलं, " हें काय ? तुम्हीही फिरायला जातां वाटतं दररोज ? "

" हो, आणि तुम्ही पण जातां वाटतं सगळीं ? "

" आम्ही अलिकडेच सुरू केलं आहे. "

त्या दिवसानंतर आम्ही पांच सहा जणं फिरायला जाऊं लागलों. बहुधा मुलामुलांच्या गप्पा निघून तीं रमत पुढें जात. मी व दामोदरपंत अर्धवट सहजपणें पण अर्धवट सहेतुकपणें, हळू हळू जात असूं. आणि मजा अशी, कीं सर्वांच्या देखत आम्हांला बोलायला मोकळंही वाटत नसे. आमचा पांच सहा जणांचा एकत्र फिरायला जाण्याचा नियम दोन महिने टिकला असेल नसेल. पुढें पुढें मुलं कंटाळलीं. मीं त्यांना वरवर पुष्कळ आग्रह करीं पण तीं येतना. मग माझ्या वाईट प्रकृतीच्या सबबविर नाइलाजानें मी व दामोदरपंत जाऊं लागलों. आम्ही दोघंच जातों ह्मणून लोकांची मला फार भीति वाटे. आणि शेवटीं आठ दिवसांच्या आंतच आम्ही दोघंच फिरायला जातों, ही बातमी लोकांत पसरली देखील. लोक टीका करूं लागले. ' अंः लोक काय म्हणतील कुणाला नि काय ! आपण कशाला पर्वा करा ! ' असं एकीकडे म्हणत व एकीकडे भीतिनेंच लोकांना टाळून आम्ही फिरायला जात असूं. ज्या घरीं मी रहात होतें, त्या घरच्या माणसांना मनांत कांहीं वाटे, पण बाह्यतः तीं माझ्या कोणत्याही वागण्याला प्रतिबंध करीत नसत. हो, आणि आईबापांनींही खरी चूक सांगितली तरी राग येतो, मग त्या माणसांनीं तर ' ब्र ' म्हणायची सोय नव्हती. आणि कोण कोणाला बोलणार तोंडावर !

आमची मैत्री वाढत चालली. आमची सुखदुःखं एक होतं चाललीं. सरळ रस्त्यानें लांबवर गेल्यावर साहजिकच दूरच्या गोष्टी

लहान दिसूं लागतात, अंधुक दिसूं लागतात. माझ्या आयुष्यांतील गत गोष्ट माझ्या मनांत अंधुक झाली, पुसट झाली. मला उलट, तिचं हंसूं येऊं लागलं. मनाचं पावित्र्य राखण्यासाठीं मीं पूर्वीं निश्चय केला होता. अलिकडे मी म्हणें, “ अं:, विवाहित, अविवाहित, विधुर, विधवा, कोणी झालं तरी तीं माणसंच आहेत. मनानेंही पवित्र असं माणूस असणारच नाहीं. मग मी तरी त्याचं एवढं बुजगावणं कशाला करूं ? मी शरीरानें दूषित नाहीं. तेव्हां मला अजून प्रेम करण्याचा आणि लग्नही करण्याचा हक्क आहे. ”

मी दामोदरपंतांबद्दल विचार करीत असें. माझं मन अगदीं वेडं झालं होतं. अशा स्थितींत दामोदरपंतांनींच मला विचारलं, “ गत आयुष्यांतील एक गोष्ट तुमच्या माझ्या आयुष्यांत सारखीच घडली. अशा समान सुखदुःखाच्या माणसांची ओळख वाढावी, हें विशेष आहे, नाहीं ? ” मला त्यांच्या बोलण्याचा रोंख कळला. पण दुधानें तोंड भाजलं, कीं ताकही फुंकून प्यावं लागतं. मीं नुसतं म्हटलं, “ हो, आहे खरं असं. ” दामोदरपंत म्हणाले, “ काय हो, मी परवां गांवाला गेलों होतों, तेव्हां संध्याकाळीं पांचच्या सुमारास मी इतका कांहीं अस्वस्थ झालों होतों. मला वाटलं, आतां तुमच्याजवळ चार शब्द बोलायला मिळावे. तुम्हांला देखील माझी आठवण झाली होती का तेव्हां ? ”

“ अगबाई, अगदीं त्याच वेळेला मला सुद्धां तुमची फार फार आठवण झाली. गंमत आहे नाहीं.”

मला स्वतःला त्याचं फारच आश्चर्य वाटलं. अलीकडे असं फार वेळां होई. सहसंवेदना ज्याला म्हणतात, तिचं प्रत्यंतर आम्हांला किती वेळां तरी येई. ती सहसंवेदना एकमेकांना सांगण्यांत व त्यामुळें अंतःकरणाचे पडसाद प्रत्यक्ष शब्दांनीं नाहीं तरी ध्वन्यर्थानें एकमेकांना कळवण्यांत आम्हांला आनंद वाटत असे.

त्यावेळीं मात्र मला वाटे, हेंच खरं प्रेम. खऱ्या प्रेमांत सहसंवेदना असते. दुसऱ्याचं मन हजारों मैलांवरूनहीं आरशासारखं स्वच्छ दिसूं शकतं. खऱ्या प्रेमानेंच देह भिन्न असले, तरी मनं एक होतात. ही प्रचीति मला यापूर्वी कधींच आली नव्हती. नदीनें आपल्या लहरींनीं किती गोंजारलं तरी खडक फार तर भिजेल पण खडक तो खडकच, तो कसा खुलणार ? त्याच्या भावना कशा उचंबळणार ? त्याला ती सहसंवेदना कशी कळणार ? संवेदना सागरालाच कळणार. म्हणूनच हजारों मैलांचें अंतर तोडून बिचारी नदी धांवत त्याच्याकडे जाते.

दामोदरपंतांनीं मला लग्नाबद्दल विचारलं व मीही ' होय ' म्हटलं. पण त्यांना अट घातली, कीं आतां काय सहा महिनेच राहिले आहेत. तेव्हां तुम्हीं एल एल. बी. व्हावं. मग लग्न करूं. असो.

आम्ही ठरवायच्या आधींच लोकांनीं आमचं लग्न ठरवलं होतं. एवढंच नाहीं, तर आमच्याच गांवच्या एका माणसानें, ' तुमची मुलगी इथें अशी वागते ' असं पत्र वडलांना पाठवलं. वडलांनीं मला तार केली. लगेच पत्रही पाठवलं. मीं त्यांना " मुळींच काळजी करूं नये मी आपलीच मुलगी आहें. माझ्या हातून असं कांहीं होणं शक्य नाहीं. " असलं, अगदीं त्यांची समजूत पटविणारं पत्र पाठवलं. पण वडलांचं समाधान झालं नाहीं. ते माझ्याकडे निघून आले. त्यांना एक दोन दिवसांत काय कळणार ? समाधानानें ते परत गेले, असं मला वाटतं !

अलीकडे माझ्या मैत्रिणींत जेव्हां जेव्हां बोलणीं निघत तेव्हां मी म्हणे, ' माझे वडील जुन्या मताचे आहेत. त्यांना मी माझं लग्न ठरवलं, तर मुळींच आवडणार नाहीं. मीं आपलं ते ठरवतील त्याशीं लग्न करायचं ठरवलं आहे. ' हें माझं सांगणं पटलं, असं वरवर माझ्या मैत्रिणींनीं दाखवलं, तरी त्या पटण्यांत जीव नाहीं, हें मला

मात्र ओळखूं येई. त्यामुळें पुन:पुन्हां असं कांहीं बोलणं काढून मी कधीं कधीं त्यांचा किंतू घालवायचा यत्न करीं. पण त्याचा उरफाटाच परिणाम मला दिसूं लागे. मग माझाच तो निव्वळ संशय होता कीं काय कोण जाणे ! चोरी उमगूं नये, म्हणून सावध-गिरी बाळगणारा चोरच कधीं कधीं लवकर सांपडतो, असंच कांहींसं झालं. मी कुठें जातें, कुणाशीं बोलतें, इत्यादि माझ्या व्यवहाराचं व हालचालींचं टिपण तयार असे. तें पुसलं जावं, म्हणून मी जें बोलें, तें त्यांना खोटं वाटतं, असं मला वाटे. काय असेल तें असो. माझा अनुभव असा आहे, कीं माझ्या वयाच्या मैत्रिणींत भांडणं व्हायला मुख्य कारणं जर कोणचीं असतील, तर तीं लग्न किंवा त्यालाच आनुषंगिक गोष्टी हीं असतात. एकादीचं लग्न ठरत असलं, कीं जगांतल्या कोणत्याही गोष्टीपेक्षां त्या विषयांत ओळखी-च्या व अनोळखीच्या लोकांचं निदान बायकांचं लक्ष अधिक. त्याबद्दल रोज नव्या बातम्या ऐकायची इच्छा इतकी तीव्र असते, कीं ती जिची तिलाच माहीत. त्यांतून प्रेमविवाह असावा. मग तर विचारायलाच नको ! तीं दोन माणसं जगापासून लपूं पाहतात आणि जग त्यांना हुडकून चव्हाट्यावर आणायला गुप्त हेरासारखं टपलेलं असतं. त्यामुळं लपूं पहाणाऱ्या माणसांना जगाचा राग येतो, वीट येतो. वस्तुतः जगाच्या या केवळ रिकामपणच्या, मन रिझवणाऱ्या गप्पा असतात. पण रागावलेलीं व चिडलेलीं तीं दोन माणसं मात्र सबंध वेळ उद्विग्न होऊन, जगावर नांग्या मारीत राहतात. त्यानें जगाला कांहींच अपाय पोहोंचत नाहीं; आपल्या हातांनीं हीं मात्र आपल्या गुप्त गोष्टीची अधिक वाच्यता करतात. पण हें त्यांना कळत नाहीं. आपलं गुपित ज्या व्यक्तीला कळलं असं त्यांना वाटतं, त्या व्यक्तीशीं त्यांचं शत्रुत्व सुरू होतं.

माझ्या मनानं असे शत्रू फार केले. कारण माझ्या व चारुद-

त्यांच्या बाबतींत आधीं वदंता होत्याच; त्यानंतर दामोदरपंत व मी याबद्दल चर्चा सुरू झाल्या. मग मला असा अंधुक, का चांगलाच संशय आला कीं मी ज्या घरांत राहात होतें, तेथूनच या बातम्यांना पाय फुटत होते. मग काय, चोराच्या हातांत खजिन्याच्या किल्ल्या दिल्यासारखीच माझी अवस्था झाली. दामोदरपंतांचं व माझं खूप वेळ बोलत बसणं, हिंडायला जाणं इत्यादि सगळ्या गोष्टी घरांतूनच ताज्या बातम्या म्हणून जात असतील, असं वाटून मी खूप चिडलें व साहजिकच दुसऱ्या सहामाहींत मीं त्या घरीं राह्यचं नाहीं असं ठरवलं.

सुटींत मी घरीं गेलें; तों वडलांच्या कानांवर या गोष्टी गेल्या होत्या. अर्थात् त्यांनीं मला त्यांबद्दल विचारलं तेव्हां नव्याण्णव गोष्टी जगाच्या आचरट जिभेनें उठवलेल्या वदंता आहेत, असं मीं त्यांना सांगितलं. वडलांजवळ सत्य बोलण्यास मी धजलें नाहीं. माझी व दामोदरपंतांची ओळख आहे, व कधीं कधीं आम्हीं कामानिमित्त भेटतों; एवढंच सत्य मीं त्यांना सांगितलं.

माझ्या वडलांच्या तापट स्वभावाची व जुन्या मतांची मला पूर्ण माहिती होती. त्यांत दामोदरपंत पडले देशस्थ आणि मी कऱ्हाडी, तेव्हां येथपासून पंचाईत होती. पण कांहीं म्हटलं, तरी या खेपेला आमच्या गांवांतच घरीं राहून काम करण्याबद्दल वडील मला आग्रह करीत होते. ते म्हणत, नुसती घरीं रहा; पण आतां नको जाऊं परगांवीं. पण मीं हरयुक्त्यांनीं मोडून काढलं, तेव्हां वडलांची तळमळ राहीना. त्यांनीं तें माझ्या वागणुकीबद्दलचं पत्र मला दाखवलं. माझ्या पोटांत धडधडत होतं. त्या पत्रांत लिहिलेलं सर्वच कांहीं खरं नव्हतं. कारण माणसांना तिखटमीठ लावायची हौस व संवय असतेच; पण तीस टक्के गोष्ट खरी होती. माझं हिंडणं, फिरणं, नाटक-सिनेमाला दोघांनींच जाणं, या गोष्टी खऱ्या होत्या. इतर वाह्यात-

पणा मात्र सपशेल खोटा होता. पण जें खरं होतं, तेंही कबूल करणं मला शक्य नव्हतं. वडलांना त्या गोष्टी भयंकर वाटल्या असत्या. शेवटीं मीं हंसून म्हटलं, 'कमाल आहे बाई लिहिणाराची! तुम्हीं मागें आलां, तेव्हां पाहिलंतच ना प्रत्यक्ष सगळं ?' पण बापाचंच हृदय तें ! आपल्या मुलीचं कल्याण व्हावं या तळमळीनेंच त्यांनीं म्हटलं "तुझं सगळं खरं असेल. पण जग विचित्र आहे, त्याला निंदेला वाव द्या कशाला ? तूं कांहीं जाऊं नको."

मीं म्हटलं, "तुमची इच्छा मी कधींच मोडणार नाहीं. पण होम क्लासच्या अधिकाऱ्यांना मीं सुरवातीस दोन वर्षं राहाण्याचं वचन दिलं आहे. त्यापैकीं सहा महिनेच काय ते राहिले आहेत. पुढच्या सुटींत आलें, कीं मग मीं परत नाहींच जायची. मग तर नाहीं ना हरकत ?"

वडलांनीं नाखुषीनेंच 'होय' म्हटलं. माझ्या आयुष्यांतील गेल्या दीड वर्षांत माझ्या मनानं किती वळणं वाकणं घेतलीं होतीं ! दामोदर-पंतांशीं माझं वागणं मला गैर वाटत नव्हतं. एवीं तेवीं लग्न ठरलेलं. मग अशा वागण्यांत पाप तें कसलं ? वडील जुन्या मताचे. त्यांना हें लग्न पसंत नसलं, तरीं सत्य सांगून त्यांचं मन कधीं तरी दुखवावं लागणार होतंच, शिवाय सहाच महिन्यांनीं दामोदरपंत वकील होणार होते ! सर्वच गोष्टींचा निकाल सहा महिन्यांत लागणार होता.

७

बायांनों, माझं पतितेचं हें चित्र तुम्ही पाहूं नका. हें मी तुमच्या-करितां लिहीतच नाहीं. माझ्या कृष्ण कृत्याचं शब्दचित्र काढून माझ्या मलाच शिव्या देण्यासाठीं मी हें लिहीत आहें. माझ्या दैनंदिनींतील हें पान पहाण्याचा कोणाला अधिकार नाहीं. पापाचं पाप कबुलीनें नाहींसं होतं, अशा समजुतीनें माझी मजजवळ कबुली देऊन माझ्या अंतःकरणांतील परमेश्वरापुढें माझी मलाच फांशीं जाऊं दे !

चारुदत्तांना ' भ्रमर ' झणून जिनें त्यांचा शतशः धिक्कार केला, त्याच मीं मनाचं पावित्र्य राखण्याचा संकल्प करीत करीत एक, दोन, तीन माणसांना मनानें वरलं. मीच भ्रमरी आहें. माझं मन अधु आहे. दाहक अग्नीच्या तांडव करणाऱ्या ज्वालांना किंवा फूत्कार टाकीत फडा आपटणाऱ्या नागाच्या चेष्टांना मोहून मीं माझा नाश करून घेतला आहे.

मला माझ्या मित्रमैत्रिणींनीं नाना तऱ्हांनीं जागी करण्याचा प्रयत्न केला, पण मी माझ्या घातकी ढोंगानें त्यांच्यावरच तुटून पडलें. त्यांच्या बहुमोल सांगीचा धिक्कार केला. वारा प्यालेल्या वासराप्रमाणें स्वैर बागडून, स्वैरपणाला स्वैरपणा न समजतां मीं आत्मघात करून घेतला.

भय्यासाहेबांची व माझी ओळख झाली, तो दिवस मी विसरणार नाहीं. त्या दिवशींच मी दामोदरपंतांशीं वचनबद्ध झालें होतें, व त्याच दिवशीं माझ्या नाशाचा विषवृक्ष मीं रुजत घातला. मी एका ओळखीच्या बाईबरोबर कांहीं कामाला निघालें होतें. तिला एका वकिलाचा सल्ला घ्यावयाचा होता. त्याचं नांव घेऊन माझी लेखणी विटाळेल. पण त्याच्या नांवानें कशाला ? त्याच्यापूर्वींच, माझ्या स्वतःचं चरित्र लिहून माझी लेखणी काळी ठिक्कर पडली आहे. त्याचं नांव भय्यासाहेब. मी त्यांच्या घरांत नवखी होतें. ती बाई मात्र भय्यासाहेबांच्या कुटुंबाच्या ओळखीची होती. आम्ही गेलों, ती वेळ संध्याकाळीं पांचची असेल. वकिलांशींच बोलायचं असल्यानें आम्हीं त्यांच्या ऑफिसकडे गेलों.

" ओहोहो, या, या, " म्हणत भय्यासाहेब नमस्कार करीत बाहेर आले. आणि आम्हांला ऑफिस शेजारच्याच एका खोलींत त्यांनीं बसावयास सांगितलं. वकिलांचा हंसरा चेहरा, भारदस्त देह, वागण्यांतलं दाक्षिण्य, यांनीं माझा ग्रह फारच चांगला झाला. ओळखीच्या

बाई मात्र औपचारिकपणेंच वरवर हंसत होत्या. भय्यासाहेबांनीं त्यांच्याकडून माझी ओळख करून घेतली. नंतर ते म्हणाले, " बरं झालं. यांच्या निमित्तानें तरी आलांत; नाहींतर आपले पाय आमच्या सारख्याच्या घरीं कशाला लागायला. येत जा अशाच. मला तुमच्या सारख्यांची ओळख पाहिजेच आहे. आमचं अडाणी कुटुंब नि चार पोरं यांना जरा चांगलं वळण लागेल. "

ते मनापासून बोलत होते, असं मला वाटलं पण माझ्या बरोबरच्या बाई अगदींच वरवरपणें होस हो म्हणत होत्या. भय्यासाहेब बोलतांना आपणाकडे कमीपणा घेऊन दुसऱ्यांशीं अत्यंत विनयानें बोलत. आणि तरीही मधून मधून म्हणत कीं, ' कुठं चुकलं, तर क्षमा करा हं. वकील असलों, तरी आम्ही अगदीं रांगडे आणि अडाणी आहोंत. पैसे मिळवावयाचे तेवढे आम्हांला माहीत. बाकी आपलं यथातथाच "

हें किंवा अशाच तऱ्हेचं अर्ध्या पाऊण तासांत ते किती तरी वेळां बोलले. आमचा तेवढ्यांत एकदां चहा झाला. आईस्क्रिम झालं. फोनोची प्लेट ऐकली. जवळचाच पानांचा डबा त्यांनीं पुढें केला. आम्ही ' नको ' म्हटलं तेव्हां ते म्हणाले, " माफ करा हं. आपली. रीत म्हणून पुढें केला डबा. " मलाही त्यांत कांहीं वावगं वाटलं नाहीं वकिलांची वकिली उत्तम चालते, असं मीं ऐकलं होतं व तशी साक्षही तेथें दिसत होती. एका बाजूला छपरी पलंगावर रूभरू गादी घातलेली; नानातऱ्हांचीं चित्रं भिंतीवर टांगलेलीं. तिथलं एकंदर दृश्य आकर्षक होतं.

यमूताईंचं काम झालं व आम्ही निघालों. वकिलांनीं आपल्या शोफरला बोलावून आम्हांला मोटारींतून जायला लावलंच म्हणाना ! आदरातिथ्याचा कळस झाला !

यमूताई म्हणाल्या, " मला नाहीं बाई असं कुणी प्रमाणाबाहेर वागलेलं आवडत. मला तिथून कधीं निघेनसं झालं होतं. का कोण

जाणे ! मला तो गृहस्थ मुळींच आवडत नाहीं. त्याची वायको मात्र भली बाई आहे. पण ही का या सभ्य गृहस्थाची रीत ? निजायच्या खोलींत बायकांना बसवायच्या ? काय ती गंधाची टिकली नि काय तो अत्तराचा घमघमाट ! पानांचा डबा कसला पुढें करायचा बायकांच्या ! " यमूताईंची बरीच टकळी चालली होती. मीं मनांत म्हटलं, ' आमच्या हिंदु लोकांना रीतभातच नाहीं. दुसरें चांगलं वागलं, तरी त्यांना सभ्यता पहाण्याची दृष्टीही नाहीं. "

त्या महिन्यांत भय्यासाहेबांनीं एक दोनदां माझ्यासाठीं मोटार पाठवली आणि मी गेलेंही. चांगलीं बायकापोरं आहेत अशा सभ्य माणसाला वाईट म्हणणारीं माणसचं मूर्ख, असं मी मनाशीं म्हणे. भय्यासाहेबांची ओळख दुसऱ्यांना सांगण्याचा संकोच मला कधींच वाटला नाहीं. कुणी आपल्याशीं चांगलं वागलं कीं आपण मुद्दाम आड रानांत शिरणं रानटीपणाचं आहे, असं मला वाटे. आमची ओळख झपाट्यानें वाढूं लागली. ते, त्यांच्या कुटुंबांतील मंडळी व मी मिळून मोटारींतून तास दोन तास हिंडायला जात असूं.

इतका अदबीनं वागणारा नि रेखीव रीतरिवाजाचा मनुष्य मीं पाहिलाच नाहीं कधीं, असं मला वाटलं. किती सुस्वभावी ! एवढा मोठा चारपांचशेंची वकिली चालणारा मनुष्य आपुलकीनें सामान्य स्त्रीकड येतो, याचं मला किती आश्चर्य वाटे ! त्यांचं कितीही आदरातिथ्य मीं केलं, तरी तें त्यांच्या पाहुणचाराच्या पासंगालाही लागणारं नव्हतं. तरी मी माझ्याकडून शक्य तें करीं.

भय्यासाहेबांनीं दामोदरपंतांना माझ्या घरीं पुष्कळ वेळां पाहिलं होतं. दामोदरपंतांची व त्यांचीही ओळख झाली होती. भय्यासाहेबांचा विनोदानें चेष्टा करण्याचा स्वभाव मला किती आवडत असे. त्यांनीं हंसत हंसत एक दिवस म्हटलं, " कां काशीताई, बरं आहे ना ? "

" हो नसायला काय झालं ? "

" नाहीं. आपलं म्हटलं दामोदरपंत गांवाला गेले आहेत; तेव्हां चैन पडतं कीं नाहीं ? "

त्यांच्या ऐवजीं दुसऱ्या कोणीं खऱ्या गोष्टीबद्दलही माझी चेष्टा अशी व एकदम इतकी मजल मारून केली असती, तर मीं क्षणार्धांत त्याचा धुव्वा उडवला असता. पण गोड स्वभावाच्या माझ्या हिंतचिंतकाच्या चेष्टेचा मला राग येणं शक्यच नव्हतं. ' इश्श ' म्हणून मी अशी कांहीं लाजत हंसलें कीं माझं व दामोदर-पंतांचं लग्न ठरलेलं आहे, असं मीं त्यांना माझ्या हंसण्यानें स्पष्ट दर्शवलं. तेव्हांपासून भय्यासाहेबांनीं माझीच नव्हे, तर दामोदरपंतांचीही अशी चेष्टा करावी, कीं कांहीं सांगायची सोय नाहीं. ते आम्हां दोघांना त्यांच्याबरोबर नाटकसिनेमाला नेत. अगदीं पुढच्या खुर्च्यांची तिकिटं काढीत. मैत्रीखातर किती पैसा ते खर्चीत ! मला वाटे, अशा मित्राचं ऋण जन्मोजन्मीं फिटणार नाहीं. त्यांनीं एक दिवस म्हटलं " काशीताई, वकिलीला इतके कठिण दिवस आले आहेत. पण दामो-दरपंत पास झाले, कीं शंभर रुपये वकिलींत मिळवून देण्याची जिम्मा मी घेतों. " माझं दामोदरपंतांवरचं प्रेम त्यावेळीं अभंग होतं म्हणून आह्मां दोघांचे खरे उतकारकर्ते भय्यासाहेबच आहेत अशी माझी खात्री झाली. दामोपरपंतांनाही भय्यासाहेबांबद्दल आदर वाटू लागला.

पुढें पुढें भय्यासाहेबांकडे गेलें नाहीं, असा माझा दिवस जात नाहींसा झाला. रोज मोटारमधून फिरायला जाण्याचा क्रम तर नित्याचाच झाला. कधीं कधीं भय्यासाहेबांचीं बायकामुलें आलीं नाहींत, तरी आम्ही दोघेंच जात असूं. भय्यासाहेबांची बायको तर एकदां मजजवळ म्हणाली कीं ' मला बरोबर फिरायला न्यायचं हें अलिकडेच पहातें मीं; नाहींतर आम्हीं गांवढळ म्हणून आम्ही आपल्या घरांतच. लोकांच्या लोकांना नेतील बरोबर; पण सत्तेच्या मोटारींत माझं

कधीं जाणं झालं नव्हतं. आणि मला तरी मेला वेळ कुठं आहे ? आतां आपली येतें महिनाभर तरी घरीं गेल्यावर कोण गोंधळ पडतो."

भय्यासाहेबांची फिरायची वेळ म्हणजे रात्रीं आठ नंतरची. तोंपर्यंत अशीलं यायचीं, इकडे तिकडे काम असायचं. पुढें भय्यासाहेबांची बायको लवकरच येईनाशी झाली. कधीं आली, तरी ती माझ्याशीं शब्दसुद्धां बोलायची नाहीं. भय्यासाहेब म्हणत. तिला तुमच्याशीं बोलतांच येत नाहीं ! माझ्या लक्षांत खरं कारण आलं होतं; पण मीं तिकडं डोळेझांक केली. बायका अशाच मत्सरी असतात. मी, दामोदरपंत व भय्यासाहेब अशीं तिघं कधीं कधीं फिरायला जात असूं. भय्यासाहेब जणूं आम्हां दोघांचे पालक अशा दृष्टीनें दामोदरपंत भय्यासाहेबांवर विश्वास टाकून होते.

आम्ही दोघंच फिरायला गेलों, कीं भय्यासाहेब प्रथम शोफरजवळ बसत. पण पुढें लवकरच ते नि मी मागेंच बसूं लागलों. आमचा इतका स्नेह. ते मला मोठ्या भावासारखे ! अशा विचारानें मीं त्यांना कधींच विरोध दर्शविला नाहीं; किंवा त्यांच्याबरोबर जाणं सोडलं. नाहीं.

एक दिवस भय्यासाहेब म्हणाले, "काशीताई, मी फार चांगला असं तुम्ही नेहमीं म्हणतां; पण लोक तर माझ्याबद्दल फार वाईट बोलतात."

मी लगेच म्हटलं, "लोकांना काय होतं ? त्यांना एकाद्याचा चांगुलपणासुद्धां सहन होत नाहीं. मला कारण सांगतां आलं नाहीं, तरी एवढं खरं, कीं आम्ही दोघंच असलों, कीं मला न् भय्यासाहेबांना बोलायला बराच मोकळेपणा वाटे. औपचारिकपणा विरून जाई. त्या वेळीं निदान मला तरी त्या मानभावी वकिलाचे डावपेंच कळले

नाहींत. मला सगळं बोलणं खरं वाटे. त्या वेळीं मी मूर्ख होतें. अंध होतें. वरच्या दिमाखाला मी भुलत होतें. " माझ्याबद्दल लोक वाईट बोलतात, अन् तुम्ही मला चांगलं म्हणतां " असं म्हणण्यांत, माझ्या उथळ मनाचा स्वतःच्या निंदेनं त्यांना ठाव पाह्यचा होता, हें मला कळलं नाहीं.

मीं म्हटलं, " असतात अशीं गैरसमजानें पोळलेलीं माणसं. भय्यासाहेब, माझ्याबद्दलसुद्धां लोक वाटेल तें बोलतात. विनाकारण माझ्याबद्दल गैरसमज होतात."

" खरं ? तुमच्याबद्दल ? कमाल आहे बुवा लोकांची."

मी म्हटलं, " अहो चारुदत्तांबद्दल नि माझ्याबद्दल वाटेल त्या गप्पा उठल्या होत्या. पण मला कधींच कांहींसुद्धां त्यांच्याबद्दल वाटलं नव्हतं. तुमची आमची मैत्री, तसंच तें होतं खरं म्हणजे. लोकांना काय होतं कंड्या उठवायला ? दामोदरपंतांनीं आणि मी ठरवायच्या आधींच लोक वाटेल तें बोलायला लागले होते ! "

" हो उद्यां तुमच्या आणि माझ्याबद्दल सुद्धां हवें तें लोक बोलायचे ! " हंसत हंसत भय्यासाहेब म्हणाले. आम्ही दोघंही हंसलों. चारुदत्तांबद्दलची गोष्ट माझ्या मनांत डांचत होतीच. त्यांचा सूड मी त्या दिवशीं खोटं बोलून घेतला. एवढंच काय, पण दामोदरपंतांचं व माझं लग्नसुद्धां लोकापवादाचा परिणाम, असं भासवून आमच्या प्रेमाची किंमत मीं कमी केली !

' गैरसमजानें पोळलेली ' असं माझं मला म्हणून मी माझ्या गतचारित्र्यावर बुरखा टाकीत होतें. माझी व भय्यासाहेबांची मी फसवणूक करीत होतें ! पण त्याच वेळीं हा मनुष्य असा तसा नसून खरा बेरड आहे, गळेकापू आहे, हें कळून न घेतल्यानें मी फसत होतें.

आतां मला वाटतं, कीं त्या वेळींच भय्यासाहेबांना माझं त्यांच्या बाबतींत स्नेहार्द्र झालेलं उथळ मन कळलं होतं. ते लाघवीपणानं

मला फसवीत होते. त्यांनीं माझी नाडी बरोबर ओळखली होती. दामोदरपंतांबद्दल माझी भावना शुद्ध, शंभर नंबरी नाहीं, अशी खूणगांठ त्यांनीं माझ्याच बोलण्यावरून बांधली असावी.

दिवसांमागून दिवस जात होते. भय्यासाहेबांना व मला अनेक वेळां मोटारींतून जातांना लोकांनीं पाहिलं होतं. त्यावेळीं मी अंतःकरणांत चरकत असें; पण त्याकडे मीं लक्ष दिलं नाहीं. भय्यासाहेबांनीं लोकांची कधींच फिकीर केली नाहीं. ते अगदीं भर वस्तींतून मोटार नेत. माझं मन म्हणे, " एवढे लोक मनांत तुझी छी थू करतात. जरा शुद्धीवर ये. " पण माझं धुंद झालेलं मन तिकडे कधीं लक्ष देत नसे.

लोक मला ऐकूं जाईल अशा तऱ्हेनें म्हणत, " भय्यासाहेब हा एक गुंड आहे. " आमची मोटार गेली कीं ओरडत, " आहे बुवा ! आतां ही बाई मिळवली वाटतं ! " पण माझ्या निर्लज्ज मनानें विवेकबुद्धीची टोंचणी जुमानली नाहीं. " लोक यांना असं कां म्हणतात ? " हा विचार कांहीं थोडे वेळां माझ्या मनांत आला नाहीं, पण हें कळूनहीं तो मी दडपून टाकला.

मी माझ्या मैत्रिणींना केव्हांच मुकलें होतें. त्यांतूनही एकादीनें जरा सूचना दिली कीं खवळून मीं म्हणें, " अशीं नांवं ठेवणारांचींच मनं पापी असतात. लोक कांहीं म्हणाले, तरी त्यांच्या इतका चांगला मनुष्य मिळायचा नाहीं. ते मला वडील भावासारखे, किंबहुना वडलांसारखे आहेत. "

अरेरे, स्वतःचं समर्थन करण्यासाठीं ' पिता ' व ' बंधु ' या पवित्र शब्दांनाही मी अपवित्र केलं. माझं मनांतलं मन त्यांना वडील किंवा बंधूच समजत होतं का ? माझं मन त्यांना कांहींच समजत नव्हतं; पण दामोदरपंतांना वचन दिल्याचा मला पश्चात्ताप होत होता, एवढं मात्र खरं. कां कोण जाणे ! भय्यासाहेबांना मी ' पति '

मानणं शक्य नसलं, तरी दामोदरपंतांच्या पाशांतून मुक्त होण्यासाठीं मी धडपडत होतें. भय्यासाहेबांची ती श्रीमंती ! त्यांची ती मनाची दिलदारी ! मी बेधडक त्यामागें धांवत होतें.

दामोदरपंतांशीं लग्न करण्याचं मी ठरवलं होतं, ही गोष्ट एरवीं मी कोणापाशीं बोललें नसतें. तसा गुप्तपणा मी पूर्वी राखलाही होता. पण भय्यासाहेब व मी यांच्याबद्दल लोक वाटेल तें बोलूं लागले, तेव्हां ते लोकांचे निरर्गल प्रलाप वाटून त्यांचीं तोंडें बंद करण्यासाठीं मी 'माझं लग्न दामोदरपंतांशीं ठरलं आहे' असं सांगूं लागलें.

दिवसां मागून दिवस जात होते. मला भय्यासाहेबांशीं दामोदरपंतांच्या देखत मोकळेपणानें बोलतां येत नाहींसं झालं. दामोदरपंत दिवसांत भेटले नाहींत, तरी पूर्वीसारखी चुटपूट लागत नाहींशी झाली. भय्यासाहेब भेटले नाहींत, तर हुरहुर लागूं लागली. पूर्वी माझं मन ताळ्यावर असतांना मी दामोदरपंतांना म्हटलं होतं, "त्यांची माझी ओळख झाली तर तुम्हांला नाहीं ना वैषम्य वाटायचं ? मला केवळ तुमच्या मताकडे पाह्यचं आहे." माझ्या अंतःकरणाची खात्री असल्यानें ते म्हणाले, "छेः माझं कांहीं म्हणणं नाहीं। बुवा. त्यांत काय आहे ? आपल्याला जर पुढें त्यांच्यामुळें चांगले दिवस दिसणार आहेत तर काय हरकत आहे ? शिवाय आपण दोघंही त्यांचीं स्नेही आहोंत."

त्यावेळीं आमच्या उभयतांच्या हितासाठीं व स्नेह म्हणून आम्ही भय्यासाहेबांशीं मैत्री केली. त्यांसाठींच दामोदरपंतांनीं ती मला टिकवूं दिली. त्यावेळीं माझं अंतःकरण दामोदरपंतांबद्दल अथांग प्रेमानें भरलेलं होतं. ही त्यांना जाणीव होती; पण आतां भय्यासाहेबांबद्दल उत्पन्न झालेल्या आस्थेनें त्या अभंग हृदयाला छिद्र पाडलं. तें अथांग प्रेम झरझर केव्हांच झिरपून गेलं; आणि ती

आस्था माझ्या हृदयांत उचंबळूं लागली. हा फरक ताबडतोब जाणला कोणी ? तर दोघांनींही; दामोदरपंतांनाही तो जाणवला व भय्यासाहेबांनाही त्याची जाणीव झाली. भय्यासाहेबांबद्दल मला वाटत असलेल्या आस्थेबद्दल लोकांत पुष्कळ गवगवा झाला होता. त्यापासून स्वतःचं रक्षण करण्यासाठीं 'दामोदरपंतांशीं माझा विवाह ठरला आहे' ही एक ढाल मीं निर्माण केली होती. 'दामोदरपंतांशीं विवाह' हा शब्दप्रयोग भ्रामक होता.

माझं हृदय दामोदरपंतांच्या बाबतींत रितं झालं होतं. त्यामुळें त्यांची किती तळमळ व तडफड होत होती ! ती कां, हेंही मला कळत होतं; पण कळल्याचं त्यांना दाखवण्याइतकं धाडस माझ्यांत नव्हतं. त्यांत मी चंचल आहें, हें सिद्ध झालं असतं. म्हणून मी दामोदरपंतांना माझ्या प्रेमाचे निनाद ऐकवीत असलें, तरी रिकाम्या भांड्याचा निनाद भरल्या भांड्यापेक्षां अधिक असतो, हें दामोदरदंतांनाही कळत होतं.

भय्यासाहेबांची फिरायला जायची वेळ आठची. कामामुळें पुढें सरतां सरतां ती दहाची झाली ! मग लोकांची भीती वाटत असली, तरी भय्यासाहेबांच्या सान्निध्याची तीव्र इच्छा माझ्या भीतीवर मात करी. मी दहा वाजतांही निःशंकपणें त्यांच्या बरोबर फिरायला जाई !

भय्यासाहेबांनीं माझ्या खांद्यावर मोटारमध्यें सहज चुकून हात पडलासं दाखवलं, त्या दिवशींच मी जळुन भस्म झालें असतें तर ! पण नाहीं ! त्या ओझरत्या हातानें माझ्या अंगावर रोमांच आले ! ते मखमालीचे होते ! हें निर्लज्ज हातालाही कळलं असावं. म्हणून 'सहज पडलेला' तो हात पुनः पुनः तीच गोष्ट करायला सरसावला. त्या निर्लज्ज हाताला निर्लज्ज माणसाचा स्पर्श कळला ! हळूहळू भीड चेपली. ती कोठपर्यंत हें मला सांगतां येत नाहीं !

एक असत्य लपवायला हजारों असत्यें खर्चावीं लागतात. माझं सर्व बोलणं, सर्व वागणं स्वतःचं समर्थन करायला लागे ! दारु-बाजाचा तोल दारूच्या धुंदींत कधीं सांवरतो का ? त्याच्या शब्दांवर कोणी विश्वास ठेवतं का ? तीच, तीच माझी स्थिति होती !

दामोदरपंतांचं माझ्यावर निरतिशय प्रेम होतं. पण आतां माझ्या शब्दांवर त्यांचा विश्वास बसणं शक्यच नव्हतं. माझ्या शब्दांचा फोलपणा माझा आचार स्पष्टपणें दाखवीत होता. रिकाम्या भांड्याचा निनाद त्यांची कशी खात्री करणार ? आमच्यांत फार वादळं उठूं लागलीं. दामोदरपंतांनीं मला विवाह उरकून घेण्याची निकड लावली. मी त्यांना साफ सांगितलं, ' तुम्ही वकील झाल्याशिवाय मी या फंदांत पडणार नाहीं. "

ते म्हणाले, " ठीक. पण तूं शपथ घे, ' मी भय्यासाहेबांच्या घराची पायरी चढणार नाहीं ' अशी ". मी माझ्या निशेंत त्यांना स्पष्ट सांगि-तलं, " माझ्यावर तुमचा विश्वास नसेल तर मीही सांगतें, कीं मला त्यांची मैत्री सोडतां येणं शक्य नाहीं."

माझं डोकं शांतपणें विचार करी तेव्हां दामोदरपंतांशीं लग्न करावं म्हणजे लोकापवाद टळेल असं मला वाटे. पण अंतःकरण त्यांचे बाबतींत रितं झालं होतं. भय्यासाहेबच माझे पंचप्राण होते. हा प्रेमाचा हिंदोळा दामोदरपंतांना मानवला नाहीं. त्यांनीं मला हरतऱ्हेनें बजावून सांगितलं. शेवटीं " दोन फसव्या पोरी भेटल्यामुळें, " त्यांनीं प्रेमविवाहाच्या भानगडींत न पडतां एका मुलीशीं लग्न उरकून घेतलं. हें मला कळलं, तेव्हां मात्र अरण्यांत पडल्यासारखं मला झालं !

दामोदरपंतांच्या लग्नाचं वर्तमान मला कळलं, तेव्हां कांहीं वेळ मला धक्का बसला. त्या धक्क्यानें विवेकबुद्धि जागी झाली आणि म्हणूं लागली. " वेडे पोरी, अजून सावध हो. " पण नाहीं. चटाव-

लेल्या माझ्या जीवाला जणूं निशा चढत होती. बुद्धीवर पुनः अभ्रपटलं जमूं लागली. मी मनाशीं म्हटलं, "झालं तें एका परी बरं झालं. माझा मार्ग मला मोकळा झाला !"

भय्यासाहेब माझ्या हातचे. मी म्हणेन तेव्हां त्यांच्याशीं लग्न लावीन हा मला विश्वास होता. आतां त्यांच्याबरोबर निर्वेधपणें मी हिंडूं, फिरूं लागलें. पण प्रणयाच्या क्रीडेची ही पाऊलवाट वाटते तितकी सोपी नसते. कुलशीलवान् अल्लड मुली मूर्खपणानें वागतलि, तर त्यांना मृत्यूशिवाय मायेनें जवळ करणारा कोण आहे? तो मृत्यु जवळ असून त्यांना दिसत नाहीं. पण अंथरुणावर पडल्या पडल्या झोपीं गेलेल्या मुलांच्या अंगावर जसा बापाचा हात असावा, तसा मृत्यूचा प्रेमळ हात त्यावेळीं माझ्या आजूबाजूस फिरत असेल कदाचित् !

अवघ्या सहा महिन्यांत भय्यासाहेबांच्या नादानें मी किती वाहवलें, हें मी सांगूं शकत नाहीं ! भय्यासाहेब सच्चा मनुष्य, अशा भयंकर प्रसंगीं तो मला सोडणं शक्यच नाहीं, अशी माझी खात्री. भय्यासाहेबांना मी विचारलं, "आतां लोकाचाराकरतां अक्षताच डोक्यावर पडायच्या राहिल्या आहेत. तेवढ्याची व्यवस्था करूं. त्याला आतां तुमची तयारी पाहिजे."

भय्यासाहेब जणूं त्या गांवचेच नव्हत, असे आश्चर्यानें माझ्याकडे पहात म्हणाले, "काय म्हणतां? वेड्या तर नाहीं तुम्ही? I never dreamt of this even (माझ्या स्वप्नांत सुद्धां कधीं हें आलं नाहीं.) माझं लग्न झालेलं आहे."

मी हतबुद्ध झालें. पण क्षणांत भयंकर दिव्याची जाणीव होऊन मी म्हटलं, "भय्यासाहेब काय बोलतां हें? शरम नाहीं वाटत असं म्हणायला? बेजबाबदारपणें माझ्या अब्रूची राखरांगोळी करायला लाज नाहीं वाटली तुम्हांला? मी नाहीं तुम्हांला जाऊं देणार. माझा काय तो निकाल करून टाका." मी त्यांचा हात बळकट धरून

ठेवला. तो हिसकून उपहासानें ते म्हणाले, "निकाल? ती जबाबदारी मी कधींच घेतली नव्हती. हें तुम्हांलाच कळायला हवं होतं. उगीच वाटेल तें बोलून माझं नांव बद्दू करण्यांत काय हंशील?" भय्यासाहेब खोलीबाहेर गेलेही.

मी मटकन खालीं बसलें. क्षणांतच सर्व शक्ती एकवटून मी खोलीबाहेर धांवल. "भय्यासाहेब मला वांचवा! मी आतां कुणाकडे पाहूं?" मी कळवळून म्हटलं पण माझं तें अरण्यरुदन होतं. 'अयाई ऽऽ काय करूं आतां' मी असहायपणें जमिनीवर अंग टाकून रडूं लागलें! पण कोण मला जवळ घेणार?

आतां रिकाम्या भांड्यांचा निनाद ऐकण्याची माझी पाळी होती; पण त्यावेळीं मात्र भय्यासाहेबांच्या शेवटच्या वाक्यांनीं आसूड मारावा तशा वेदना मला होऊं लागल्या. प्रेमाची मयासुर नगरी विरून कठोर सत्य मला चरचर चिरूं लागलं. आतां मी कोण? कुणाची? बाबा, आई तुमच्या तोंडाला काळोखी फांसणारी ही कपाळकरंटी कुणाची? मी कुणाची नाहीं. मला कुणी नाहीं. माझ्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडला. त्या खोलीबाहेरच्या जगाचं अस्तित्व मला भयंकर भासूं लागलं! भीतिनें मी गुदमरून गेलें. बाबा, तुमचं न ऐकतां या सहामाहींत मी आलें! तुम्हांला फसवलं! इतक्या रागानें नका पाहूं, नका, मी असलं काळं तोंड लोकांना दाखवून तुम्हांला नाहीं दुःख देणार! बाबांचे लालबुंद डोळे मला जाळताहेत असं मला वाटूं लागलं. दामोदरपंत तिरस्कारानें माझ्याकडे पहात आहेत, असं मला वाटलं! लोक! ज्यांना मी कस्पटासमान समजत होतें, ज्यांचे शब्द वाऱ्याच्या लहरीइतक्याच किंमतीचे मी समजत होतें, त्याच लोकांचे तेच शब्द घंटेच्या निनादाइतक्या जोरानें माझ्या कानठळ्या बसवूं लागले. रस्त्यावरील गाड्या टांगे मोटारी यांच्या आवाजांनीं माझं रक्त गोठायला

लागलं सगळं जग जणुं मला हुडकायला मजकडे वेगानें धांवत येत होतं आणि सांगत होतं, ' हं हीच. हीच ती पापिणी. ' कुठें लपणार मी ? दगडाप्रमाणें मी निश्चल झालें ! अंधार, सर्वत्र अंधार ! शून्य ! भयंकर शून्यता मला गिळून टाकायला लागली. खोलीच्या चार भिंती हादरून या पापी स्त्रीला दडपून टाकण्यासाठीं जवळ येताहेत असं मला वाटलं. मी ओरडलें. माझ्याच ओरडण्यानें माझा भ्रम नाहींसा झाला ! खोलींत मी एकटीच आहें तर ! मी खोलींत इकडे तिकडे पाहूं लागलें ! समोर टांगलेल्या तसबिरींतील प्रत्येक देवता मजकडे रोषानें पहात होती. मी दृष्टि दुसरी-कडे वळविली. भिंतीवरील फोटोंतील प्रत्येक मनुष्य माझ्या-कडेच पहात होतं " हीच ती. " मी समोर पाहूं लागलें. खोलीं-तील प्रत्येक अणु–अणूला वाचा फुटून तो सांगत होता ' हीच ती. ' कुठं पाहूं ? कुठं जाऊं ?

धरणी दुभंग होऊन मला पोटांत घेईल तर बरं ! मी भीतभीत पुन्हां तसबिरांकडे पाहिलं. मला त्या नजरेला नजर भिडवेना. मी झपाट्यानें उठलें. मेनकेनें शकुंतलेला पुढें करतांच डोळयावर कातडें ओढणाऱ्या विश्वामित्राच्या तसबिरीचे मी राई राई एवढे तुकडे केले ! क्षणभर मला आसुरी समाधान वाटलं ! भय्यासाहेबांचे तुकडे तुकडे केल्याचं आसुरी समाधान झालं. पण तें एकच क्षण ! पावि-त्र्याचा झेंडा मिरवायला भय्यासाहेब केव्हांच निघून गेले होते. माझ्या अंगाची लाही झाली ! नको. भय्यासाहेब तुम्ही माझा निकाल लावायला जबाबदार नाहीं. मीच माझा निकाल लावतें. कधीं तरी तुमच्या पापांचा घडा भरल्याशिवाय राहणार नाहीं.

माझ्या भिकार शरीरप्रकृतीवर शक्तिवर्धक म्हणून मी स्ट्रिकनिन्चा उपयोग करीत असें. मी झटकन् उठलें. स्ट्रिकनिन्ची सर्व पूड पेल्यांत घातली. थरथरणाऱ्या हातानें त्यांत पाणी ओतून तो पिऊन

टाकला. माझं सर्वांग थरारून गेलें. शरीर ताठून गेलं. मला चक्कर आली.

\+ * +

जगाच्या कालकूटाचं सारसर्वस्व म्हणून तो विषाचा प्याला मीं प्यालें; पण मेलें नाहीं. काळ आला होता, पण वेळ आली नव्हती. माझ्या आईवडलांचं पवित्र कुल भ्रष्ट करून त्यांच्या नांवाला उघड उघड काळिमा लावण्याचं पाप माझ्या हातून घडायचं होतं ! तें घडलं आहे. स्वर्गाचीं दारं या पापिणीला कायमचीं बंद झालीं आहेत. भय्यासाहेब उत्तम वकील होते ! ते उजळ माथ्यानें वावरतात.

आणि मी ? दुःखानें बेचिराख झालेल्या माझ्या मनांत आतां विरक्तीशिवाय कांहीं नाहीं. सुखाच्या मागें धांवून सुखाचा कणही न मिळतां, केवळ कालकूटाची धनीण मी झालें आहें. जगाकडून तप्त मुद्रा ठोकल्यामुळें वठलेल्या माझ्या मनाला पालवी फुटण्याची कधीं आशा आहे का ?

कधींच नाहीं. उलट, गतायुष्यांतील माझ्या आठवणींचीं भूतं अजून मला भेडसावतात. मी मला जगापासून कोंडून घेतलं आहे. चारुदत्त गेले. दामोदरपंत गेले. भय्यासाहेब गेले. तिघेही सुखी झाले. त्यांपैकीं प्रत्येकाच्या सहवासांत सुख तर नाहीं, पण माझ्यासाठीं मी सूळ निर्माण करीत होतें. आणि आतां त्या त्रिशूळावर मी मला कायमचं टांगून घेतलं आहे.

---

# बाबांचा संसार माझा कसा होणार ?



आज कितीक दिवस मी पहातें आहें. आईवडलांशीं पटवून घेणंच मला अशक्य झालं आहे. याचा दोष माझ्याकडे नाहीं. असं मी कसं म्हणूं ? पण तितकाच तो माझ्या आईवडलांकडेही आहे, असं मला वाटतं. कधीं कधीं असंसुद्धां वाटतं, कीं प्रत्यक्ष जन्म देणारी आई न् बाप जरी झालीं तरी त्यांचं प्रेम अगदींच निःस्वार्थी असतं, असं नाहीं. मी असं बोलायला लागलें, कीं तुम्ही हंसाल, नांव ठेवाल ! तेव्हां त्या आधीं माझं म्हणणं मी तुम्हांला सांगतें, आणि तुम्हीच माझ्या प्रश्नाचा निकाल लावा.

माझे आईवडील गरीब घराण्यांतील आहेत. वडलांना सत्तर रुपये मिळतात. पण आम्हीं भावंडं सहा आहों. मी सगळ्यांत मोठी. आमची एका पाठोपाठ बहिणींची पंगत पाहून कित्येक आयाबाया आईला सांगत कीं तुम्ही मुलीचं लग्न करा म्हणजे मुलगा होईल. एकदां आईबापांच्या स्वाभाविक इच्छेप्रमाणेंही माझं लग्न करावं, असं त्यांच्या मनांत प्रथम होतं. पण योग्य स्थळ मिळालं नाहीं. पुढें पहिला भाऊ झाला. त्यानंतर माझ्या लग्नाचा प्रश्न बाजूस राहून मला ग्रॅज्युएट करायचं नक्की ठरवलं. त्याचीं दोन कारणं असतील. आपल्या गरीबीच्या संसाराची ओढाताण त्यांना जाणवतच होती. त्यावरून प्रसंगच आल्यास मुलीला निदान पोटापुरतं मिळवण्याइतकी ताकद आल्याशिवाय संसारांत ढकलणं बरं नाहीं, असं त्यांना वाटलं असावं. दुसरी स्वाभाविक इच्छा कदाचित् हीही असेल, कीं मुलगी शिकली तर कांहीं दिवस मुलीकडून आपल्या संसाराला हातभार लागेल. दोन्हीही इच्छा वावग्या नव्हत्या. हल्लींच्या काळांत मुलांपेक्षां मुलींना नोकऱ्या लवकर मिळतातही. त्यांनीं माझं शिक्षण पुरं करायचं ठरवलं एवढं खरं.

आतां बोलूनचालून कॉलेजांत जाणारी मुलगी मी. मला कांहींच लागणार नाहीं का ? पुस्तकं हवींत, फी हवींच. नाहीं म्हटलं, तरीं वडलांच्या शकी पिळून काढणारा खर्च माझा होई. अजून दुसऱ्या भावंडांनीं शिक्षणांत फारशी मजल मारली नसल्यानें शिक्षणाचा मोठा खर्च असा माझाच होई. मला त्याची किती रुखरुख असे. पण मी तरी काय करणार ? तरी मी किती साधेपणानं राहीं; पण आई आपली सारखीं बोलत असे, कीं तुला हेंच लागतं, तेंच लागतं. एवढा खर्च करायचा न् पुढें या दुसऱ्याच्या घरीं जायच्या ! कशाला हा बुडित खर्च ! तिचं म्हणणं खरं असलं, तरी त्या स्पष्ट बोलण्याचा मला राग येई. त्याला माझा इलाज नव्हता. या गोष्टी न बोलतांच जाणायच्या असतात, असं नाहीं का ? कसंही असो. माझं शिक्षण झालं. आज सात वर्षं नोकरीही झाली.

परवांचे बाबांचे शब्द माझ्या अगदीं जिव्हारीं लागले. कशावरूनसं निघालं होतं. मी म्हटलं कसं बाबांना, " बाबा अडीअडचणी आपल्या-सारख्याच्या घरांत आल्या कीं कांहीं मागें शिल्लक नसल्यानें मोठी पंचाईत होते नाहीं का ? तर मी पंचवीस रुपये दरमहा मागें टाकूं का ?'

त्यांना माझ्या बोलण्याचं इतकं वाईट वाटलं कीं पुसतां सोय नाहीं. ते म्हणाले, " हेंच, हेंच तें. पैसा मिळायला लागला, कीं ज्याला त्याला आपलं म्हणून कांहीं तरी सुचायला लागतं. मग हळू हळू आई नाहीं ! बाप नाहीं ! भाऊ नाहीं व भावंडं नाहीं !"

मला अगदीं आश्चर्य वाटलं, मी म्हटलं, " बाबा, उद्यां जर कांहीं अचानक खर्च आला तर ? नको का आधीं विचार करायला ?"

त्यावर ते उसळून म्हणाले, " मला सगळं कळतं आहे. ज्याचे त्याचे स्वार्थ निर्माण झाले, कीं कुटुंबाची धुळधाण व्हायला कांहीं वेळ नाहीं. आली अडचण तर पाहूं मग. सध्यां म्हणतात तशांतलं. रोजचं कसं होईल ही भ्रांत आहे !"

मी कांहीं आतां लहान नव्हतें. आज सात वर्षं मी नोकरी करीत होतें. तरी सुद्धां माझ्यांत न् इतर भावंडांत कांहींच फरक नव्हता काय ? समजा, आज नाहीं उद्यां मीं लग्न करायचं म्हटलं तर स्वतः-जवळ पैसुद्धां शिल्लक नाहीं. अशा स्थितींत व्हायचं कसं ? मी बी. ए. जरी झालें, तरी लग्नाच्या पात्रतेचें तें प्रमाणपत्र होऊं शकत नाहीं. ती उलट अपात्रताच ठरते. कारण सुशिक्षित व विशेषतः अविवाहित स्त्री म्हटली, कीं समाज कान टवकारतो. जेथें प्रेमविवाह असेल, तेथें कदाचित् नसेल प्रश्न. पण मला तें कसं शक्य होणार ! लोकापवादाचे भीतीमुळें मी कोणांत मिसळूं शकत नाहीं. आईबाबांनाही तें आवडणार नाहीं.

बरं. मग लग्नाला उभी राहिलें, तर दोहोंकडील खर्च करून लग्न करून घ्या, असं वरपक्षाला सांगायचं कीं काय ? त्यांत माझ्या आई-वडलांना कांहींच वाटणार नाहीं ? निदान माझ्या स्वाभिमानाला धक्का बसेल खास !

परवां मात्र मी बाबांच्या जवळ पैसे शिल्लक टाकण्याबद्दल बोललें, तेव्हां त्यांनीं असे कांहीं विपरीत उद्गार काढले ! पस्तीशी उलटलेल्या कुमारिकांचीं उदाहरणं देऊन त्यांनीं म्हटलं, “ त्या नाहीं का रहात ? मग तूंच एवढी उतावीळ कां ? आणि एव्हांपासून पुढची काळजी कां करतेस ?”

मी मनांत म्हटलं, “ खरं आहे. त्यांची पस्तिशी उलटली आहे न् मला सारी तिशीच उलटते आहे ? तेव्हां मी कां काळजी करायची ? तिशी भरली तरी मी उतावीळच ! ”

बाबा म्हणाले, “ मुलांची गोष्ट निराळी, मुलींची कांहीं तशी नाहीं. मुलांना तसं राहणंच कठीण जातं. मुली सुशिक्षित असल्या कीं त्यांना कसली आली आहे भीती ? मुली कांहीं मुलांइतक्या भडकून जात नाहींत.” मी मनांत म्हटलं “ खरंच, भीती असते, म्हणूनच

जणुं लग्न करायचं असतं !! मुली स्वतःच्या तोंडानें बोलूं शकत नाहींत, म्हणून त्यांना भावनाही नाहींत ! चांगलं आहे हें तत्त्व !"

पुढें बाबा म्हणाले, 'कितीतरी बालविधवा सदाचारानें शेवट-पर्यंत राहूं शकतात. उलट ब्रह्मचारी पुरुष हजारांत एकादा नाहीं मिळायचा. बायकांचीं मनं उच्छृंखल होऊं शकत नाहींत आणि दुसरं असं, कीं संसार हें क्षणिक सुख आहे. मी तर म्हणेन, गरीबानें या भानगडींतच पडूं नये !"

मला राग आला न् हंसूंही आलं.

"आजपर्यंत सगळींच माणसं संसाराची असारता सांगत आलीं आहेत. बाबांना सुद्धां असं कुणीं आधीं सांगितलंच असेल कीं ! पण ही चूकच अशी आहे, कीं कळून सवरून प्रत्येकाला करावीशी वाटते म्हणून तर जग चाललं आहे. नाहीं तर मोठा कठिण प्रसंग येता ?"

अर्थात् हे शब्द मी मनांत म्हटले; पण ते अगदीं ओंठावर आले होते ! त्या दिवशीं बाबांनीं जवळ जवळ स्पष्टच सांगितलं, कीं जरी तुला वाटत असलं, तरी तुला लग्न करतां येणार नाहीं.

ते म्हणाले, आम्ही केला मूर्खपणा. नको होता एवढा संसार वाढवायला. पण आतां कांहीं मारून तर नाहीं टाकायचीं पोरं. आम्हीं मेलों तर तीं गल्लोगल्लीं हिंडतील ! कुटुंबाकरतां स्वार्थ सोडला पाहिजे. या आपपरभावानेंच तर सगळं बिनसतं. ज्यानें त्यानें आपलंच पाह्यचं मनांत आणलं, तर कसं व्हायचं ? तूं तरी स्वतः-बद्दलचा दूरचा विचार कशाला करतेस ?" मला त्या दिवशीं काय बोलावं, हेंच कळेना. मला असल्या बोलण्याचा तिटकाराच आला; बाबांचं बोलणं त्यांच्या दृष्टीनं ठीकच असेल कदाचित्. मला त्यांची मनःस्थिति कळत कां नाहीं ? पण त्यांच्या मनाप्रमाणेंच मलाही मन आहे, मानवी भावना आहेत, त्याला मी काय करूं ?

माझी आई कशीही असली अगर बाबा कसेही असले व या गरिबीमुळें नको ते शब्द त्यांनीं उच्चारले, तरी त्यांच्या मागें प्रेम आहेच, हें मी विसरूं शकत नाहीं. दारिद्र्याच्या कठोर आघातांनीं मायासुद्धां हृदयाच्या कोठल्या कोपऱ्यांत दडून बसते आणि दारिद्र्याला तोंड देण्यासाठीं वज्राचं कवच घेते. माझ्या आईवडलांचं उणं अधिक बोलणं झालं, म्हणजे त्याक्षणीं मला फार राग येतो. पण पुनः हेंच वाटतं, कीं कांहीं झालं तरी ती ' आई ' न् ते ' बाबा ' आहेत. " कठोर असा एकच शब्द ते बोलले, पण त्याबरोबर लहानपासूनच त्यांच्या कोट्यावधि मायेच्या शब्दांनीं न् प्रेमळपणानेंच तूं लहानाची मोठी झालीस ना ? तेवढ्या शब्दाचीच कृतज्ञ मनानें आठवण कर म्हणजे कठोर शब्द कुठल्या कुठें विरून जाईल " असं मी मला सांगें.

मात्र मला शांतपणानें विचार करूनही एक कोडं उकलत नाहीं, कीं, बाबांचा संसार माझा व्हायचा कसा ? त्यांत आपपरभाव नष्ट करायचा कसा ? माझा संसार म्हणजे मुलाचा संसार नाही. तो दुसऱ्याच्या घरीं जाऊन करायचा. त्याची सुखदुःखं माझीं मला.

बाबांचे विचार ऐकून मी थक्क झालें. त्यांना तरी माझं बरं होऊं नये असं खात्रीनें वाटत नसेल. पण गरीबीच्या चरकानें त्यांच्या संसाराची अशी कांहीं चमत्कारिक आणि नाजुक स्थिति झाली आहे, कीं त्या निराशेच्या व भीतिच्या दडपणामुळेंच केवळ त्यांच्या तोंडून त्या दिवशीं असे बदसूर निघाले. मी खूप रडलें. माझी विचारसरणी वडलांना कशी कळत नाहीं ? ती मी बोलूं कशी ? बाबा तरी एकदां तरुण होतेच ना ?

हें त्यांना कळत नाहीं म्हणूनच मला कधीं कधीं वाटतं, कीं आई-बापांचं प्रेमही व्यापारी प्रेम असतं. मुलांकडून मोबदला न मिळाला तर तें प्रेमाचें नाणेंही खणखणीत वाजत नाहीं. मग त्याला हवं तर व्यवहार

म्हणा. पण त्या मोबदल्याकरतां मनुष्याचं मन थोडं तरी विकृत होईलच होईल. माझ्या भवितव्याचा विचार करूं लागलें कीं बाबा मला स्वार्थी म्हणतात; पण त्यांच्या संसाराकरितां कां होईना, माझ्या भावना दूर झुगारून देणारे बाबासुद्धां त्याच दोषाचे मालक होत नाहींत का ?

कित्येक वेळां मला एका गोष्टीबद्दल गूढ वाटतं आणि तें म्हणजे स्वार्थ कशाला म्हणायचं नि निःस्वार्थ कशाला म्हणायचं ? मला तरी वाटतं, कीं स्वार्थ हा शब्द बहुरूपी आहे. एका बाजूनें तो पूर्ण स्वार्थ वाटेल तर हळूहळू रंग पालटींत तोच स्वार्थ निःस्वार्थासारखा दिसूं लागेल, निःस्वार्थ म्हणून ज्याला आपण म्हणतों, तोसुद्धां एका अर्थी स्वार्थच नाहीं का ?

एका मानसशास्त्रज्ञानें म्हटलं आहे कीं, एखाद्या मनुष्यानें एकादं वाईट कृत्य केलं तर आपण रागावतों, नि त्याला सुधारण्यासाठीं धडपडतों. त्यांत खरं म्हणजे तो वाईट असण्यांत आपल्याला एक प्रकारें दुःख असतं. तें आपलं स्वतःचं दुःख नाहींसं व्हावं म्हणूनच आपण त्याला सुधारण्याची खटपट करतों. आईबाप मुलांना शिस्त लावण्याचा प्रयत्न करतात. कां तर मुलं चांगलीं व्हावीं म्हणून. पण मुलं चांगलीं व्हावीं हें तरी त्यांना कां वाटतं ? तर मुलं वाईट असण्यांत त्यांच्या स्वतःच्या अंतःकरणाला जें दुःख असतं तें कमी व्हावं म्हणून !

एखादा मोठा वंद्य पुरुष स्वार्थत्याग करतो याचा अर्थ स्वार्थत्याग करण्यांत सुख असतं, स्वार्थत्याग त्यानें केला नाहीं तर त्याला दुःख वाटतं.

खरोखर ही विचारसरणी खरी असली तर कोणाही निःस्वार्थी माणसाला त्याच्या सुकृत्याचं फळ कोणीही देणार नाहीं. जो तो म्हणेल "स्वार्थत्याग ? अहो हें ढोंग आहे. स्वतःच्या सुखासाठींच हें सगळं. त्यांत कसली स्तुति न् कसला गुणगौरव ?"

याही पलिकडे जाऊन शास्त्रज्ञ भावनाशून्य अंतःकरणानं कसा विचार करतात हें पहाण्यासारखं आहे. प्लेटोनीं का कुणीसं म्हटलं आहे, कीं 'आई सुद्धां मुलाला कां पाजते, तर दुग्धधारा दाटून आल्यानें तिच्या अंगच्या कळा कमी व्हाव्या म्हणून !' मी ज्यावेळीं हें वाक्य वाचलं तेव्हां तें मला अगदींच पटलं नाहीं. वाटलं, बोलून चालून निर्घृण हृदयाचा शास्त्रज्ञ ! त्यानें असे नाहीं तर कसे उद्गार काढायचे ? आईबद्दल असे उद्गार ! मग जगांतील इतरांना आपमतलबी म्हणायला ह्या शास्त्रज्ञांना काय कठीण जाणार आहे ?

पण अनुभवानें जर या विचारसरणीकडे पाह्यचं म्हटलं तर हें बरंचसं खरं असावं असं वाटूं लागतं. स्वत्वाची भावनाच मुळीं स्वार्थ खेंचून आणणारी आहे. 'माझं कुटुंब' 'माझी आई' 'माझे बाबा' 'माझा भाऊ' 'माझी बहीण' असं जेव्हां जेव्हां मी म्हणतें, तेव्हां तेव्हां कुटुंबावर अथवा प्रत्येक व्यक्तीवर माझं जें प्रेम असतं, तें स्वार्थावरचं अवगुंठण असतं. स्वार्थच प्रेमाचा बुरखा घेऊन वावरत असतो. त्याच्यांत कांहीं चांगलं वाईट, किंवा कांहीं तर तम अशी प्रतवारी असणं, याचा परोक्ष वा अपरोक्ष संबंध 'माझ्या'शीं असतो. माझ्यांतील 'मी' वर त्याचा परिणाम होत असतो. तो सुखदायक परिणाम व्हावा म्हणूनच, म्हणजे स्वार्थानेंच मी या सर्वांचं चांगलं चिंतीत असतें. त्या 'मी' वर यांचं चांगलं होण्याचा परिणाम तितकासा सुखदायक होत नाहींसा झाला व माझंच केवळ चांगलं होण्यानें मला सुख होऊं लागलं, कीं मी 'स्वार्थी' झालें. कारण इतरांच्या सुखाची मीं उपेक्षा केली; तें थोडं फार कमी केलं.

माझं तसंच आईबापांचं नाहीं का ? त्यांची स्वार्थाची व्याप्ति मोठी असते. तीं मुलांकडे, पोटच्या गोळ्यांकडे स्वतःइतक्याच आस्थेनें, आत्मीयत्वानें पहातात. म्हणूनच कुटुंबाची उन्नति ती आपली उन्नति,

तेंच आपलें सुख अशी त्यांची विचारसरणी असते. कुटुंबाची उन्नति ती आपली म्हणणारीं आईबापं निःस्वार्थी असं आपण म्हणतों. त्यांनाही असंच वाटतं. तीं स्वतःचं शरीर झिजवीत असतात; सर्वस्व कुटुंबासाठीं खर्च करीत असतात. पण पुनः प्रश्न हाच येतो, कीं तीं असं कां करतात ? त्यांत त्यांच्या अंतरात्म्याला सुख होतं म्हणून. स्वतःच्या सुखाची गोष्ट करणं व आईबापांनीं स्वतःच्या सुखाची गोष्ट करणं, हे दोघांचे स्वार्थच खरे. पण तऱ्हा निराळी ! एकादं मूल ' ढ ' असणं, आळशी असणं, त्याला सुरेल आवाज नसणं, त्याचा पर-जातीयाशीं अथवा परधर्मीयाशीं विवाहसंबंध येणं, एक ना दोन, हजारों तऱ्हा आईबापांना दुःखाच्या असतात. कांहीं गोष्टी कुलाला लांछन, कांहीं गोष्टी त्यांना स्वतःला लांछन, कांहीं त्यांच्या जातीला लांछन अशा त्यांना वाटतात. स्वकुल, स्वजाती, स्वधर्म इत्यादि गोष्टींतील स्वत्वाला धक्का लागल्यानें आईबाप दुःखी होतात. त्यांना सुख मिळत नाहीं. मुलानें ' असं नसावं ' ' असं करूं नये ' असं त्यांना वाटतं. त्याच्या उलट मुलाला ' तसं असण्यांत ' ' तसं करण्यांत' सुख असतं. दोघांचीं सुखं निराळ्या तऱ्हेचीं. आईबापांचा स्वार्थ ' कुल, जाति, धर्म, अपत्य यांबद्दल वाटणारें प्रेम ' असें नांव घेतो, तर मुलाला कुल, जाति, धर्म यांबद्दल कांहीं वाटत नाहीं, केवळ स्वतः-बद्दलच वाटतं म्हणून त्याला स्वार्थी म्हणायचं.

एकूण सर्वांचा सगळाच स्वार्थ नि सगळाच निःस्वार्थ. प्रश्न केवळ व्याप्तीचा ! त्यामुळेंच तो चांगला वाईट ठरत असतो.

मी सुद्धां स्वार्थी आहें. माझं प्रेम आईवडलांवर कोठपर्यंत ? तर माझ्या स्वार्थाच्या आड आलं नाहीं तोंपर्यंत ! पण माझ्या भावनांना दूषण न देतां, त्या स्वाभाविक आहेत, असंच नको का त्यांना वाटा-यला ? आणि तसं त्यांना अंतःकरणांत वाटतही असेल ! जीं आई-बापं असं बोलतात, तो त्यांचा दोष नसून त्यांना भेडसावणाऱ्या

परिस्थितीचा आहे हेंही खरं. एवढंच कशाला ? तुह्मीं म्हणायच्या आधीं मीच असं म्हणतें, कीं मुलींना शिकवणाऱ्या आईबापांचा पैसा हा त्यांना परतफेडीच्या दृष्टीनें मुळींच उपयोगाचा नसतो. मुलगा पित्याचं ऋण फेडतो, आह्मी ऋणाला मात्र कारण होतों. खरा मुलगाच तारण होऊं शकतो. माझ्याऐवजीं मुलगा असता तर किती बरं झालं असतं, असं उतार वयांत बाबांना वाटत असेलही.

आईबाबा पुरीं निःसमर्थ झालेलीं. त्यांनीं काय करायचं ? न् या अफाट जगांत त्या पोरांनीं काय करायचं ? ज्या घरांत एक मुलगी बी. ए. होऊन मिळवती झालेली, तिथें तिच्या आईबापांना आपलीं इतर मुलं वारांगुळीला लागलेलीं उघड्या डोळ्यांनीं कशीं बरं पहावतील ? अशा भीषण परिस्थितींत त्यांनीं माझ्याकडं नाहीं तर कुणाकडे पहायचं ?

असे विचार आले, कीं कांहीं काळ मला सुचत नाहींसं होतें, पण लगेच असंही वाटतं, कीं आईबाबांच्या मागें मीं कुणाकडे पाह्यचं ? मलाही कठोर जगाशीं एकाकी टक्कर देणं कठीण नाहीं का ? अगदीं याच विचारांनीं मी माझ्या भवितव्याचा विचार करूं लागतें !

आईबापाच्या मागें लहानग्या चार भावंडांना जवळ करून तोच ‘ माझा संसार ’ मानून राहण्याइतकं धैर्य, खंबीरपणा माझ्यांत नाहीं. त्याला मी तरी काय करणार ? तो माझा दुबळेपणा आहे. ज्यांना तें जमेल त्या मुलींना मी ‘ वंद्य ’ मानीन.

बरं आतांच लग्न न करतां असंच राह्यचं कांहीं दिवस म्हटलं, तर आईवडलांची सुस्थिति लवकर येण्याची आशा आहे का ? आणि बोलूं नये तें बोलतें, उद्यां उशिरां लग्न केल्यानंतर मला मुलं-बाळं झालीं तर म्हातारपणापर्यंत पहिल्या मुलाचं तरी शेवटपर्यंत शिक्षण वगैरे मला करतां येईल का ? त्यांच्या आधींच आह्मीं ‘ राम ’ म्हटलं तर त्यांचं कसं व्हायचं ? आईबापांपेक्षांही आमचा संसार

भयंकर होणार नाहीं काय ? इतका दूरवर विचार केल्याबद्दल तुम्हीं मला किती हंसाल ! किती दूषणं द्याल ! कितीक आईबाप तर म्हणतील, कीं मुलींना शिक्षणही देऊं नका न् त्यांच्याकडून अशीं बेअब्रुचीं बोलणीं पण नकोत. माझी कथा स्पष्ट सांगितल्यानें आईबापांचीं मनं शिक्षणाविरुद्ध बिथरविल्याचं पातक मला लागेल. पण मी काय करणार ? आपल्या देशांत ओढवलेल्या दारिद्र्यामुळ कुटुंबसंस्थेचे पायेही गदगदां हालल्याशिवाय राहणार नाहींत. आईबापासारख्यांचे जिव्हाळ्याच्या प्रेमाचे पाशही थरारल्याशिवाय राहणार नाहींत. गरिबीमुळं वा अन्य कारणांनीं मुली प्रौढ होईतों अविवाहित राहणार ! अन् प्रौढ विवाह हवेत म्हटलं, तरी पुरुषांत मिसळणंही आम्हीं अनीतीचं समजणार ! इकडे विवाहासाठीं त्यांना शिक्षण देणार, पण शिक्षण नि प्रौढ वय यानीं मुलींच्यांत आलेलं व्यक्तित्व आम्हांला खुपणार. एकीकडे आईबापांची विचारसरणी अशी नि दुसरीकडे मुलींचे मुलींना प्रश्न असणार. तेव्हां कसा काढावा यांतून मार्ग ? कुणाच्या स्वार्थापुढं कुणी नमावं ?

मला तर यांतून मार्गच दिसत नाहीं. स्वतःबद्दल विचार करणें हें निसर्गाला धरूनच आहे. सृष्टीचाहि संसार असाच नाहीं का ? पुष्पफळांनीं वृक्ष पल्लवित होतो. त्यांतील बीही परिपक्व झाल्यावर वृक्षानें त्यांना सदैव आपल्या शाखांवर धारण करायचं म्हटलं तर तें शक्य कसं आहे ? तीं फळं गळून दुसरे ठिकाणीं पडायचीं व त्यांचीं दुसरीं वृक्षफुलें निर्माण व्हायचीं, हा तर सृष्टीक्रम आहे. ज्या झाडाचें फळ त्याला तें कधींच लाभत नाहीं. मग दोघांनीं हळहळून उपयोग काय ? त्यामुळें मला कधीं कधीं असं वाटतं कीं अशा परिस्थितींत ज्या त्या मुलीनें आपला प्रश्न आपण हवा तसा सोडवावा. असले गुंतागुंतीचे प्रश्न आपल्यासाठीं दुसरीं सोडवूं शकत नाहींत !

---

# प्रेम कीं पशुवृत्ति ?

माझ्या आईचं जीवन आठवलं कीं मला स्त्रीजन्माची कींव करावीशी वाटे. पुरुषांच्याबद्दल तिटकारा येई तो कदाचित् अवास्तवही असेल. पण माझं मन माझ्या परिस्थितीनेंच तसं केलं. मी लहान वयांत जें पाहिलं, त्यानें माझ्या मनाला धक्का बसला. माझा मोठा भाऊ वारला त्याची बायको—माझी वहिनी केवळ वडलांच्या वागणुकीला भिऊन कायमची माहेरीं जाऊन राहिली; हें मला माहीत आहे. पुरुषांच्या जन्माला येऊन जेवढे चाळे करतां आले, तेवढे माझ्या वडलांनीं केले. मला त्यांना 'वडील' अगर 'बाबा' असं म्हणायची सुद्धां लाज वाटते. आईला बाबांनीं किती करायला लावलं तें आठवलं कीं माझं हृदय भरून येतं. तिनें आपल्या नवऱ्यासाठीं आपलीं दुःखें दडवून ठेवलीं, पण तिच्या मृत्यूनें तीं घराच्या सांधीफटींतून जगाला कळवलीं.

माझी आई तर मला सोडून केव्हांच गेली व बाबा जेव्हां जेव्हां माझ्या लग्नासाठीं स्थळ शोधीत तेव्हां मला त्यांचा आणि साऱ्या पुरुषांचा चा वीट आलेला असे; कारण माझ्या आईचं चित्र माझ्या डोळ्यापुढून हालत नसे. नको तें लग्न न् नको तें विघ्न, असंच मला वाटे. माझ्या लग्नाबद्दलच्या कल्पना कांहीं विचित्र झाल्या आहेत. त्याला कारण माझी घरची परिस्थिति.

* * * *

एकादी नुकतंच लग्न झालेली मुलगी पाहिली, कीं इतर मुली जशा तिच्या भोंवतीं आनंदानें गराडा घालतात तसा आनंद मला कधींच होत नसे. उलट नाक मुरडावंसं वाटे. प्रेमाच्या जाळ्यांत सांपडून अंतःकरणांत धुंद झालेली मुलगी पाहिली, कीं मला तो पुरुष फसव्या

तर नसेल ना ? असंच एकदम वाटायला लागे. कधीं कधीं दोनचारदां प्रेमविवाह फिसकटल्यानें लोकांच्या उपहासाला कारण झालेल्या मुलीं-बद्दल मला सहानुभूति वाटे. लग्नाची बेडी कायमची पायांत पडायच्या आंत, पुरुषाच्या नीचपणाचा हिला सुगावा लागला हें बरं झालं, असं वाटे. "मुली फसव्या असतात. अमक्या तमक्या तरुणाला वचन देऊन मुलीनें तें मोडलं" असं मी ऐकलं, कीं माझं मन उत्तर देई, "बरं झालं फसवलं तर ! लग्न पदरांत पडेपर्यंत प्रेमविवाहांत पुरुष हा स्त्रीचा बंदा गुलाम असा वागतो. तेवढं एकदां पदरांत पडलं कीं, झालीच याची नादिरशाही सुरू. कोण विचारतो तिच्या मनाला !" मी उघड असल्या बाबतींत कांहीं बोललें नाहीं, तरी मला पुरुष जातच नेहमीं फसवी वाटे.

'लग्न व्हायचं म्हणून' मुली लाजतांना मी पाहिल्या, कीं मला किळस येई. असं वाटे कीं या मुलींनीं खरं म्हणजे शरमायचं. यांत त्यांना काय गंमत वाटते कोण जाणें !

मला असे प्रसंग आठवतात कीं, ज्या वेळीं मला आपण होऊन कोणी गृहस्थांनीं लग्नाबद्दल मागणी घालावी. खरं म्हणजे मागणी घालण्यांत इतरांच्या दृष्टीनें कांहींच गैर नाहीं; पण मला मात्र मागणी घालणाराबद्दल राग येई; तिटकारा येई. लग्नासाठीं पाशवी आचारासाठीं हांवरा झालेला हा मनुष्य आहे असं वाटे.

कुमारिका म्हणून राहणं, हें मी श्रेष्ठ पावित्र्य समजत असें. तसं राहणं कठीण, म्हणून गोंडस नांव देऊन लग्न अस्तित्वांत आणलं असलं पाहिजे, ही माझी पक्की समजूत होती. म्हणून शक्य तोंवर असल्या पापी आचारापासून दूर राह्यचा माझा मनःसंकल्प होता. माझ्या मनांत काय काय कल्पना येत हें सांगितलं, तर सगळ्यांना माझ्या वेडेपणाचं हंसूं येईल. पण मला पुष्कळ वेळां असं वाटे, कीं उच्चतम मैत्रीला जीव भुकेलेला असतो, तर मग त्या मैत्रीला पुरुषच

कशाला हवा ? पुरुषाची मैत्री ही अपवित्रच असण्याचा बराचसा संभव; तेव्हां मैत्रिणी मैत्रिणींनीं एकाच घरांतल्या सारखं राहावं म्हणजे झालं. आम्ही मैत्रिणी मैत्रिणी कधीं फिरायला गेलों, कीं असे कांहीं विषय निघायचेच. आम्हांला सगळयांनाच वाटे, कीं पुरुष हा एक स्वार्थी, अधिकार गाजवून मतलब साधणारा प्राणी आहे. संसारांत मुलाबाळांनीं जिकीरीला आलेली बाई पाहिली, कीं पुरुषाच्या वागणुकीचा मला तिरस्कार येई. त्या बाईच्या दुःखाला सर्वस्वीं याची धुंद प्रवृत्ति कारण आहे असं वाटे. इतकं असूनही 'पति हा परमेश्वर' समजणाऱ्या बायकांचा मला चमत्कार वाटे. त्यांना पतींबद्दल गैर बोललेलं सहन कसं होत नाहीं हें पाहयलं म्हणजे मला आश्चर्य वाटे.

मीं तर ठरवलंच होतं, कीं मुळींच लग्न करायचं नाहीं. पण माझ्या बरोबरीच्या इतर मुली, पुरुषांना नांव ठेवतां ठेवतां, पटापट लग्नं करून गेलेल्या पाहून तर मला त्या अविचारी आहेत असं वाटे. दोन दोन मुलं झालेल्या त्याच मुली मला भेटल्यावर मी त्यांना 'सांसारिक जीवन कसं वाटतं ?' असं विचारीं. त्या म्हणत, "बरी बाई तूं ! लग्न बिग्न केलं नाहींस. काय ग त्रास हा ! संबंध दिवस पोरांचं नि चुलीचं करतां करतां पुरे वाट" पण त्यांचं उद्वेगाचं हें बोलणं मला अगदीं ओठावरचं आहे, हें ओळखूं येई. यांना मग अशा संसारांत कशी गोडी वाटते, हें मला एक गूढ वाटे.

लहान मुलं मला फार आवडत; पण मी दुसऱ्यांचीं मुलं घेऊन खेळवीं मला माझं लग्न, आणि माझीं मुलं, या दोन्ही कल्पनांची भीति वाटे !

*　　　　*　　　　*

लग्न ! काय माझ्या कल्पना झाल्या होत्या कुणाला ठाऊक ! लग्नांच्या जुळवाजुळवी न् लग्नांचे सोहाळे पाहिले, कीं मला माणसांच्या ढोंगीपणाचं हंसूं येई. लग्न म्हणजे माणसानें ढोंगीपणानें पवित्र नांव

दिलेला आचार, असं मला वाटे. म्हणन लग्न म्हटलं कीं मला तिरस्कारच येई. कितीही पवित्र ठरवलं तरी लग्नाचा खरा हेतु शरीरसौख्य हाच ना ?

अगदीं प्रेमविवाह म्हटलं, मनामनांची मिळणी म्हटलं तरी त्या मनांचे चाळे ही शरीरसौख्यासाठीं चाललेल्या नाटकाची पहिली नांदीच असत, नाहीं का ?

कधीं कधीं मी कादंबरींतल्या नायिकेच्या ठिकाणीं मला ठेवून पाहीं. मला प्रेमळ नायकाच्या चेष्टा असह्य होत. त्यांत कामुकता वाटे, कधीं असंही मनांत येई, कीं खरंच मीं लग्न केलं, नि माझे पति माझ्याशीं असे वागले, तर मला किती तिरस्कार येईल त्यांचा ? केवळ मैत्रीसाठीं लग्न होऊंच शकणार नाहीं का ? केवळ मानसिक सुखासाठीं शरीरसौख्याचा ज्यांत गंधही नाहीं, असं लग्न असूंच शकणार नाहीं का ? मी जर असा प्रश्न कुणाचा विचारला, तर लोक मला मूर्खांत काढतील, म्हणून मी बोलत नसें; पण अगदीं अस्सा विचार माझ्या मनांत येई.

मला पुरुषजातीबद्दल तिटकारा किंवा भीति असली तरी अविवाहित राहण्यांत समाजाचे टक्केटोणपे किती खावे लागतील हेंही मला कळे; म्हणून एखादे वेळीं वाटे कीं, करावं लग्न पण केवळ मैत्रीसाठीं. त्यांत पाशवी भावना मुळींच नको.

× × ×

माझ्या विचारमालिकेंत असे विचार येत असले, तरी पुढें पुढें कित्येक वेळीं मला माझ्या जीवनांत कांहीं तरी उणं आहेसं वाटूं लागलं. मैत्रिणी म्हटल्या, अगदीं जिवाभावाच्या मैत्रिणी म्हटल्या, तरी त्यांच्याशीं बोलून जीवनांत पूर्णता आहेसं वाटेना. जी ती मैत्रिण आपल्या आपल्या जीवनक्रमांत गुंग. माझ्यांत जिचं चित्त पुरं गुंतेल, अशी कोणीच मैत्रिण नव्हती. माझी मी एकटी, माझ्याबद्दल कुणाला आस्था वाटत नाहीं, अशा भावनेनें मला एक प्रकारें उदास वाटे.

मैत्रिणी करून कांहीं जीवनाला पूर्णता येणार नाहीं. त्याला पुरुषाच्या मैत्रीचीच आवश्यकता आहे, हें मला नव्यानें पटूं लागलं. पण मला ती निव्वळ मैत्री पाहिजे होती.

* * * *

प्रभाकर अतिशय सरळ स्वभावी होता. सदैव कुणालाही मदत करायला तो तत्पर असे. त्याच्या सद्भावना त्याच्या आचरणांत प्रतिबिंबित झालेल्या दिसत. एम्. ए. होऊन तो नुकताच कॉलेजांत प्रोफेसर झाला होता. अलिकडे कां कोण जाणे, माझं मन न कळतां त्याच्याकडे ओढ घेऊं लागलं होतं. माझी त्याच्याशीं पुष्कळ दिवसांची ओळख असली तरी ती वरवरचीच होती. मला पूर्वी त्याच्या गुणांची साक्ष पटली असली तरी ती अंतःकरणाला भिडली नव्हती. त्याच्यांतील कित्येक गुण नव्यानेंच मला दिसूं लागले होते. त्यामुळें कधीं कधीं बोलण्याचालण्या इतकीच असलेली ओळख माझ्या मनाच्या ओढीमुळेंच वाढूं लागली. प्रभाही पूर्वीपेक्षां माझ्याशीं बराच मनमोकळेपणानें बोलूं लागला. याचं कारण मला वाटतं, आपल्या अंतःकरणाचे पडसाद सर्वत्र उमटत असतात. आपलें अंतःकरण एकाद्या व्यक्तीबद्दल शुद्ध असेल तर त्या व्यक्तीचेंही आपल्या बाबतींत तसंच असतं. आपलंच मन शुद्ध नसेल, तर दुसऱ्याचंही आपल्याबद्दल शुद्ध नसतं. प्रभाबद्दल मला आपलेपणा वाटूं लागला. तसाच त्यालाही माझ्याबद्दल वाटूं लागलेला मला दिसे.

आमची मैत्री निष्काम, शुद्ध अशी मला वाटे. त्या मैत्रीपासून पूर्वी न मिळालेल्या आनंदाचा आस्वाद मला मिळूं लागला. मैत्रीण निराळी, मित्र निराळा. प्रभा माझा मित्र होता. त्याच्या मैत्रींत स्वार्थ नव्हता कीं पुरुषी अरेरावी नव्हती. माझ्या शुद्ध मैत्रीचं स्वप्न त्याचे बाबतींत खरं ठरणार असं मला निश्चित वाटूं लागलं. मैत्री या दृष्टीनें पाहिलं तर मला असं आढळलं कीं, मुली किती संकुचित

मनोवृत्तीच्या असतात ! बारीक कारणांनीं रागावणं, रुसणं, फुगणं हा त्यांचा मनोधर्मच असतो. त्यांचं जगही लहान असतं. तशीच त्यांच्या मनाची फेंकही आंखूड असते. त्यांचीं मनं हळुवार कांचेच्या भांड्यासारखीं असतात. मुलीमुलींतील मैत्री ही फार दिवस टिकायलाही कठीण. दोन कांचेचीं भांडीं केव्हां एकमेकांवर आपटतील आणि त्यांचीं किती शकलें उडतील, याचा नियम नसायचा. इतकी नाजूक मैत्री पुरुषाचीं नसते. ती कणखर असते आणि मृदुही असते. शेंकडों मैत्रिणींपेक्षां एका मित्रामुळ जीवन सकस होतें. दिवसा मागून दिवस गलें. न कळतां कांहीं विलक्षण अशी माझी वृत्ति बनूं लागली. माझ्याबरोबर त्याचीही तशीच बनत होती. आम्हांला दिवसांतून एकदां तरी भेटल्याशिवाय चैन पडेनासं झालं. आणि अगदीं मनांतलं बोलायचं, तर माझ्या मैत्रीच्या भावनेंत कांहीं निराळाच फरक होत आहे, असं मला स्पष्ट कळूं लागलं. प्रभाशीं बोलतांना मला कधीं कधीं संकोच वाटूं लागला. दृष्टीची भूक वाढली तसतसा तिचा चोरटेपणाही अधिक वाढला. तो चोरटेपणा प्रभाच्या नजरेस येऊन तो विलक्षण हंसे, त्यानें तर मला असा कांहीं संकोच वाटायला लागला कीं, सांगतां येत नाहीं ! प्रभा मजकडे पाही तेव्हां माझी इच्छा नसली तरी माझी दृष्टि दुसरीकडे वळे. शब्दस्वरूप न देतां दृष्टीच्या खेळानें आम्हांला अननुभूत आनंद होत होता.

मीं मागाहून या गोष्टींचा विचार करीं; तेव्हां मला भीति वाटे. मनांत असं येई कीं, यांतच त्या लग्नाचीं—पाशवी आचाराचीं—बीजं रुजलीं नसतील ना ? मी न कळत असल्या तिरस्करणीय भावनांच्या आहारीं जात नाहीं ना ? मला भीति वाटे व मी निश्चय करीं, कीं तें कांहीं नाहीं. अगदीं निर्विकार मैत्री ठेवायचा प्रयत्न यापुढें करायचा !

पण किती फोल हा निश्चय ठरत असे ! प्रभा आला नाहीं, कीं तळमळ लागायची. आला कीं अंतःकरण नाना तऱ्हांच्या विकारांनी भरून यायचं ! निःशब्दपणें एकमेकांकडे बघण्यांत सुखाचं सर्वस्व मिळाल्यासारखं वाटे. न भेटल्यानें हुरहुर कमी होत नसे व भेटल्यानें समाधान होत नसे.

एकदां प्रभाकराच्या हाताचा माझ्या हाताला सहज स्पर्श झाला. माझ्या सर्वांगांतून गोड लहरी उसळून आल्यासारखं वाटलं. त्याच स्पर्शाचा ध्यास लागून राहिला ! पण त्या ध्यासाबद्दल माझी मलाच मी दोष देऊं लागलें. असं झालं, तर आमची मैत्री कसली निर्विकार राहणार !

प्रभा माझ्या दृष्टीआड असे, तेव्हां मी निर्विकार मनानें मैत्रीचा चित्रपट नजरेपुढें आणी. मैत्रिणीमैत्रिणींच्या मैत्रीचीही मी आठवण करीं. इतकी नि अशी तळमळ, हुरहुर व गूढ आनंद मला कधींच झाला नव्हता. आमची मैत्री म्हणजे गोड समाधीच होती. माझ्या अपूर्व जीविताला आतां पूर्णता येत आहे, असं मला वाटे. त्या मैत्रींत मी जग विसरलें होतें. त्या मैत्रींत सर्व जगाला विसरून अखिल भूतलावर आह्मां दोघांनाच मी पाहीं. प्रभा न् मी यांचंच सर्व जग. त्या पलिकडे कोणत्याच गोष्टी मला महत्वाच्या वाटल्या नाहींत.

प्रभाचीही स्थिति माझ्या सारखीच होती. आह्मी दोघं अनेक विषयांवर प्रथम बोलत असूं. पण पुढें पुढें लग्न व त्यासंबंधीं आमचे विचार एकमेकांना बोलून दाखविण्यांत आम्हांला विशेष आनंद वाटे. माझे विचार मी प्रभाला सांगितले; त्याचेही विचार बरेचसे माझ्यासारखे होते. कदाचित् दोघंही या प्रांतांत नवशिकीं असल्यानें आमचे विचार सारखे असतील. 'पाशवी आचारा'चा आम्हां दोघांनाही तिरस्कार होता. पवित्र, दिव्य, निष्काम अशी मैत्री आम्हां दोघांना हवी होती. आणि आमच्या तीन वर्षांच्या प्रति दिवशीं वाढणाऱ्या मैत्रींत आम्हां दोघांनाही पावित्र्य, दिव्यत्व व निष्कामत्व यांचा

आभास होत होता. एकमेकांसाठीं स्वत्वाचा त्याग करणारीं व सर्वस्वीं एकरूप अशीं आमचीं मनं झालीं होतीं. आपपर भाव राहिलाच नव्हता. आमचं हंसणं, बोलणं, चालणं सगळ्यांत एक प्रकारचा पवित्रपणा आम्हांला वाटत होता.

मला वाटे, आज नाहीं म्हटलं तरी तीन वर्षं आमची मैत्री आहे. तास न् तास आम्हीं दोघंच बोलत बसतों. इतर पुरुषांसारखा प्रभा जर आपमतलबी, स्वार्थी, अरेरावी असा असता, केवळ पुरुषी–पाशवी वृत्तीचा–असता, तर त्याचं तसं स्वरूप एकदां तरीं मला दिसलं असतं. प्रभाची भावना किती निराळी होती ! तो माझ्या पावित्र्याचं किती कसोशीनें रक्षण करीत होता. माझं पावित्र्य राखणं म्हणजे त्याचं स्वतःचं पावित्र्य राखणं, असंच त्याला वाटत होतं. माझ्या चारित्र्यावर अस्पष्ट काळी छाया पडणं, म्हणजे स्वतःच्याच चारित्र्यावर कलंक, असं तो समजत होता. मला त्याच्या सान्निध्यांत निर्धास्तपणा वाटे. माझा तो रक्षणकर्ता आहे, त्यानें कांहीं केलं, तरी त्यांत वावगं असणार नाहीं अशी मला खात्री झाली होती. पण त्याचबरोबर प्रभा इतका जवळ, अगदीं माझा, असं असूनही त्याच्यापासून मी दुरावलें आहें, असं मला वाटे. जीवनाला पूर्णत्व येत आहे, पण आलं नाहीं याबद्दल माझी रुखरुख वाढत होती. मला काय पाहिजे होतं ?

मला काय पाहिजे होतं, तें कळत होतं. पण माझं माझ्याजवळ सुद्धां तें बोलण्याला मी धजावत नव्हतें ? एका हाताच्या अंतरावर प्रभा असूनही, मला तो दूर दूर वाटत होता. चित्तांत अस्वस्थता वाढत होती. मी मलाच प्रश्न करीं, "तुला काय पाहिजे ? ही तळमळ कां ? स्पर्शासाठीं ? स्पर्श ही पाशवीपणाचीच एक पायरी नाहीं का ? प्रभानें तुला जवळ घ्यावं, असं तुला वाटतं ? पाशवीपणाचा सोपान तूं चढत नाहीस का ? याच पायऱ्या चढून तूं लहान

पणापासून हीन लेखलेल्या ठिकाणीं जात नाहींस ना ?" काय असेल तें असो. माझं मन असं विचारूं लागलं कीं, माझ्या मलाच त्यांत आतां विशेष अर्थ वाटत नाहींसा झाला होता. प्रभानें मला स्पर्श करणं, मला जवळ घेणं यांत वावगं असं मला वाटे ना ? माझ्या प्रभाला मी जवळ घेणं अगर प्रभानें मला जवळ घेणं, यांत मला आमच्या पवित्र मैत्रीच्या पूर्णत्वाचा पवित्र क्षण दिसूं लागे.

प्रभा म्हणाला " इंदू, प्रेम ही पशुवृत्ति आहे, असं मला एके काळीं वाटे. पण तें चुकीचं होतं असं आतां मला वाटतं."

" हं मलाही असंच वाटतं अलीकडे. प्रेम ही पशुवृत्ति नाहीं. समीपता, सरूपता, सलोकता व सायुज्यता या प्रेमाच्या चार सोपानपरंपरांनींच जीवनाचं साफल्य होतं असं मला वाटतं. प्रभा, आपण दोघांनीं मिळून हा सोपान चढून गेल्यानेंच मला एकरूपतेचं, निःस्वार्थतेचं आणि पावित्र्याचं तें स्थान मिळेल, असं मला वाटूं लागलं आहे. जें मी हीन लेखलं, तेंच दिव्य असं मला आढळलं आहे."

# प्रेमाची पारख



मी प्रत्येक दिवस ओढून काढतें आहें, असं म्हटलं, तर त्यांत मी थोडीसुद्धां अतिशयोक्ति करीत नाहीं. मला कशांतही उत्साह वाटत नाहीं. माझ्या मनांतील भावना एकदां होरपळून गेल्या त्या गेल्या. तुम्हांला वाटेल, हें क्षणिक वैराग्य आहे. असेलही कदाचित्. माझ्या वयाची नुकतीच पंचविशी उलटलेली पाहतां, ही वैराग्य-वृत्ति क्षणभंगुर असणं, अगदीं शक्य आहे. माझ्या जीवनांत मला गोडी वाटण्यासाठीं, ही अवस्था जितकी लवकर नाहींशी होईल तितकी मला हवीच आहे.

अमुक पहावं, अमुक ऐकावं, अमुक करावं, अशा हरतऱ्हांनीं माझ्या वृत्ति उचंबळत होत्या. पण त्यांना आतां इतकी ओहोटी लागली आहे कीं, माझं जीवन खरं निर्माल्यावत् झालं आहे. मी लहानपणापासून अतिशय स्पष्टपणें बोलणारी. मला कित्येक फटकळही म्हणत. मीं बुद्धीनेंही चांगल्यापैकीं होतें. त्याचबरोबर मी महत्त्वाकांक्षीही होतें. मी दिसण्यांत उत्तमांपैकीं तर खासच नव्हतें; पण कोणीही माझ्याकडे पाहून नाक मुरडावं, इतकीही वाईट नव्हतें; दहाजणींसारखीच होतें. माझ्या बरोबरीच्या मुली रूपाविषयीं बोलणीं निघालीं, तर मला ' तरतरीत दिसतेस ' असं म्हणत.

माझ्या आईबापांची स्थिति बेताचीच होती. बी. ए. व्हायचं ध्येय मी मनाशीं पक्कं ठरविलं होतं. माझ्या आई वडलांना कोणी कोणी माझ्या विवाहाबद्दल विचारीत; व त्यांनाही एकदां माझा विवाह होऊन गेला तर बरं, असं वाटत असे. पण मी महत्त्वाकांक्षी होतें. ती महत्त्वाकांक्षा माझ्याच अंतःकरणांत नव्यानें उदित झालेली नसून आई वडलांकडूनच आनुवंशिक गुण म्हणून तो माझ्यांत

आला होता. स्थिति बेताची असूनही आई वडील अतिशय महत्त्वाकांक्षी होतीं. त्यामुळें माझ्या विवाहाचा प्रश्न जितका त्यांना महत्त्वाचा वाटत होता, तितकीच माझी महत्त्वाकांक्षाही वाढत होती. माझ्या विवाहानंतर माझी महत्त्वाकांक्षा फलद्रूप होण्यास वाव सांपडेलच, असं त्यांनाही निश्चितपणें वाटत नसे. पण तसं झालं नाहीं, तर मला सुख लागावयाचं नाहीं, असंही त्यांना वाटत असे.

हायस्कूल अगर कॉलेजमध्येंही मी सर्व चळवळींत भाग घेई. मला अनेक बक्षिसें मिळून माझ्या करणीचं चीज होत असे. मुलींमुलींतील खेळांच्या सामन्यांत मला दरवर्षीं तीन चार तरी बक्षिसें मिळत. वक्तृत्वांत मुलांमुलींची चढाओढ असे. तेथेंही मला बक्षिस मिळालेलं होतं. सांगण्याचं तात्पर्य हेंच, कीं माझ्या तात्पुरत्या ज्या छोट्या महत्त्वाकांक्षा होत्या, त्या सफल होत गेल्या. मी हरहुन्नरी व हुशार गणली जात असल्याचा, माझ्या आईवडलांनाही अभिमान वाटत होता. इंटरमध्यें असतांना घडलेली गोष्ट. मला एक स्थळ आलं होतं. माझ्या आईवडलांनीं एकदां खडा टाकून पहावं, म्हणून मला लग्नाचा आग्रह केला. त्यांत माझे विवाहाबाबत विचार कळावे, हाही त्यांचा हेतु असावा. तें स्थळ त्यांना पसंत होतं. मला त्यांनीं त्याबद्दल विचारतांच, माझ्या फटकळ स्वभावाप्रमाणें, मी अगदीं स्पष्ट शब्दांत म्हटलं, कीं "मला इतक्यांत लग्न करायचं नाहीं. आपल्या कुलाचा नांवलौकिक वाढेल असं मुलांनीं कांहीं करून दाखविलं, तरच मला आनंद वाटेल. 'जन्मा आला हेला पाणी वहातां मेला, असं जीवन कामाचं नाहीं,' असं तुम्हींच आम्हां मुलांना नेहमीं ह्मणतां मग इतक्यांतच, शिक्षणही पुरं न होतां, मी लग्न केलं, तर 'पाणी वहातां मरणं' या परतं मीं काय साधलं?"

माझ्या या उत्तरावर आईनें नुसतं एवढंच म्हटलं, 'अब्रू ही

कांचेच्या भांड्यासारखी असते. तिला तड जाऊं न देतां आयुष्य घालविणं ही गोष्ट फार कठीण आहे. तें ज्याला साधेल, त्यानें आपल्या महत्त्वाकांक्षांना अवश्य वाव द्यावा. ”

तेव्हां मीं म्हटलं “ होय, माझी इच्छा आहे, कीं एवढं शिक्षण घेतल्यासारखं त्याचं चीज करावं. मग कोणाला माहीत काय घडेल नि काय नाहीं तें. ” खरोखर सांगतें, त्यावेळीं ‘ चीज ’ अगर ‘ माझ्या महत्त्वाकांक्षा ’ यांची रूपरेखा जर कोणीं विचारली असती तर मला मुळींच सांगतां आली नसती, पण मला बौद्धिक जविन हवं होतं. माझ्या आईवडलांनींही माझा रागरंग, आकांक्षा व उत्साह पाहून माझ्या विवाहाचा प्रश्न त्यावेळीं तसाच ठेवला. मलाही बरं वाटलं. लहानपणापासून माझ्यांत एक प्रवृत्ति होती कीं, मोठ्यांचीं चरित्रं वाचावयाचीं. त्यांच्यासारखंच आपणही मोठं व्हावं असं मला वाटे. मोठं म्हणजे काय तें सांगतां आलं नाहीं तरी त्यासाठीं लहानपणा-पासून माझी धडपड असे व त्यामुळेंच माझ्या आईवडलांनीं माझ्या विवाहाचा प्रश्न त्यावेळीं तितकाच ठेवला. अंतर्यामीं त्यांना माझं कौतुक वाटलं असावं खास.

मी इंटर झालें. बी. ए. झालें. चांगली वरच्या वर्गांत मी पास झालें व एका शाळेंत नौकरी झाली. मला आठवतें आहे, इतर मास्तरणी शाळा संपल्यावर नुसत्या रिकामटेकडेपणांत वेळ घालवीत. मी उरल्यासुरल्या वेळांत कांहींना कांहीं उद्योग करीत असें. ज्या माझ्या आईबापांनीं पाण्यासारखा पैसा खर्च करून मुलाप्रमाणें मला शिक्षण दिलं, त्यांचं ऋण अंशतः तरी फेडणं हा माझा दृढ संकल्प होता. कोणास ठाऊक असल्याला पुढें काय बुद्धि होईल या विचारानें मी वागत होतें.

बी. ए. होऊन तीन वर्षें झालीं, माझ्या मनांत विवाहाचा विचार आलाही नाहीं. मी बी. टी. साठीं नांव नोंदविलें.

तेथें शिक्षणशास्त्रावर अत्यंत विद्वान् गृहस्थांचीं व्याख्यानें व पाठ होत. आम्ही मोकळेपणानें ज्या शंका विचारीत असूं, त्या आमच्या निरसनही होत. तेथें पांसष्ट एक ग्रॅज्युएट्स होते. मला कधीं त्यांच्याशीं विशेष बोलण्याचं कारणच पडलं नाहीं. तरी प्रत्येक माणूस केवळ नजरेनें प्रत्येकाच्या ओळखीचं झालेलं होतं.

एकदां कांहीं समारंभ होता. आमच्या प्रोफेसरांच्या सांगण्यावरून त्या क्लासमधील एक गृहस्थ माझ्याकडे कांहीं विचारण्यासाठीं आले. त्यांना मी वर्गांत अनेक वेळां पाहिलं होतं; पण मी त्यांच्याशीं प्रथम तेव्हांच बोललें. त्यांची निर्भय दृष्टि, अत्यंत धिमेपणानें व शिष्टाचार पाळून बोलण्याची पद्धति, इत्यादि कांहीं कांहीं गोष्टींचा माझ्या मनावर ठसा उमटला. पण तो इतका त्रयस्थपणानें कीं, माझ्या मनानें त्याला विशेषसं महत्त्व दिलं नाहीं. पण ते घरीं येऊन गेल्यापासून आम्ही एकमेकांकडे पाहिल्यावर ओळखीनें हंसत असूं. पुढें क्वचित् एखादा शब्दही बोलूं लागलों. एक दोन महिन्यांनीं ओळख वाढून, आम्ही आमच्या अभ्याससंबंधींही बोलूं लागलों. पुढें त्यांचीं माझ्याकडे व माझींही त्यांच्याकडे कांहीं कामें निघूं लागलीं! तेव्हां माझ्या मनाची मला पुरी ओळख पटली नसली, तरी एवढं खरं कीं, उगीच क्षुल्लक गोष्ट महत्त्वाची वाटून त्यांच्याशीं मला बोलावंसं वाटे. त्यांचंही तसंच होत असावं. क्षुल्लक गोष्टींना महत्त्वाच्या करून, पुष्कळ वेळ बोलत बसण्याची संधि आम्ही मुद्दाम आणतों, ही गोष्ट आम्हां दोघांच्याही मनांत आम्ही समजून होतों. पण असं स्पष्टपणें एकमेकांना आम्हीं म्हटलं नव्हतं. असं का व्हावं, याचा पत्ता आम्हांलाही—निदान मला—लागला नव्हता. भेटल्यावर उगीचच हंसूं येणं, त्यांत कांहीं तरी गूढ आनंद असलेला स्पष्ट दिसणं, अशा तऱ्हेचा होत असलेला बदल आम्हांला कळत होता, तरीही त्याबद्दल आम्ही कधींच बोललों नाहीं. पण एक-

मेकांना ओढ लागलेली आम्हांला स्पष्टपणें कळत होती. मी त्यांच्या-बद्दल त्यांच्या एकंदर स्थितीबद्दल उत्सुक होऊं लागलें. एवढेंच नव्हे, तर मला त्या गोष्टी कळतील तेवढ्या मी कळून घेत असें. त्यांच्या पावलांचा आवाज मला कितीतरी लांबून कळूं लागला. माझे कान त्यासाठीं उत्सुक असत. वरून बेपर्वाई दाखविली तरी आंतून कसले कढ येत होते, ते माझे मलाच माहीत. त्यांचं सुद्धां असंच होत असावं. खरं सांगतें, इतकी स्थिति झाली होती, तरी आमचं संभाषण अगदीं कोणीही ऐकावं, इतकं शुद्ध होतं. पण माझी खात्री आहे, त्यांच्या डोळ्यांतील आपुलकीच्या भावनेची विलक्षण मृदुता मला जशी दिसत होती, तशी त्यांनाही माझ्या डोळ्यांत दिसत असावी. मला त्यांच्या या जाणिवेची जाणीव होई, तेव्हां अगदीं चोरट्यासारखें होई. दुरून ऐकणाराला संभाषणांत आमच्याकडून काडीइतकं मर्यादेचं उल्लंघन झालं असं वाटलं नसतं. परंतु आम्हां दोघांचं भाषण जर तिसऱ्या मनुष्यानें सतत जवळ बसून ऐकायचं ठरवलं असतं, तर आमच्या नजरेंत दिसून येणारे आमच्या मनाचे गूढ खेळ त्याच्या सहज लक्षांत आल्याशिवाय खास राहिले नसते. जी भावना डोळ्यांत पुरेपूर भरली होती अगर चेहेऱ्यावर स्पष्टपणें उमटली होती, ती आम्ही मात्र आपसांत शब्दानेंही बोललों नाहीं. ते मजकडे वारंवार येत, तरीही त्यांच्या सान्निध्याचा मला ध्यास लागूं लागला. कधीं कधीं माझ्या हृदयांत उगीचच कालवाकालव होऊं लागे. मला विनाकारण एकटं एकटं वाटूं लागे. तें इतकं, कीं नकोत इतकीं माणसें भोंवतीं असूनही जणूं अरण्यांत एकटी पडल्याप्रमाणें, मी एका बाजूस जाऊन कोणाला न कळेल अशी मनसोक्त रडत असें. असेच कांहीं दिवस गेले. शेवटीं मी निश्चय ठरविला. पण शब्द ओंठावरून परतत. एक प्रकारें संकोच व भीति वाटे. अशा स्थितींत दोन दिवस गेले. रात्रीं १० वाजले असतील. मी वड-

लांना घेऊन घरांत एका बाजूस माझा चेहरा न दिसेल अशा ठिकाणीं गेलें.

अत्यंत धीरानें मीं म्हटलं, " दादा, तुम्ही मला लहानपणापासून सांगत आलां कीं, आपलं मन ओळखून वागा म्हणजे भीति नाहीं. माझ्या मनांत आजपर्यंत जें जें आलं, तें सर्व मी तुमच्याजवळ बोललें. आतांही माझ्या मनांतलि खळबळ मी तुम्हांला सांगणार आहें.

माधवराव आपलेकडे येतात. आपण सर्वजण कधीं कधीं एकत्र बोलत असतों. त्यांचे माझे विचार जुळतात. मला त्यांच्याबरोबर आयुष्य घालविल्यास महत्त्वाकांक्षा पुऱ्या होती-लसं वाटतं. माझ्या मनांत अलीकडे हे विचार फार येतात. तुमच्या सांगण्याप्रमाणें तुमच्या जवळ मी माझं मन आज विनय बाजूस ठेवून खुलं केलं आहे. त्यांनाही माझ्याबद्दल असंच वाटतं, असं मला वाटतं. पण मी त्यांना परस्पर या बाबतींत विचारणं, म्हणजे तुम्हांला फसविल्यासारखं होईल म्हणून तुम्हांला सांगितलं. तुम्ही त्यांना विचारा."

हें बोलत असतांना मी जितकी गोंधळलें तशी पूर्वी कधींही गोंधळल्याचं मला आठवत नाहीं. बोलण्याचं मनांत होतं त्याच्या शतांशेही मला बोलतां आलं नाहीं. कोणीकडून तरी वडलांना माझ्या मनाची थोडीतरी कल्पना येईल, इतपत वेडंवांकडं मीं बोललें. माझ्या वडलांनीं त्यांना चांगलं पाहिलेलं होतं. त्यांच्याबद्दल त्यांनीं चांगले उद्गारही काढलेले होते. त्यामुळें यावेळीं माझ्या अंतः-करणाला कितीतरी आशा वाटत होती, इतरांच्या दृष्टीनें त्यांच्यांत गरिबी हाच एक दोष होता. पण माझ्या मतानें तो दोष नव्हताच. उलट माझ्या शिक्षणानें मी गरिबाचा संसार सुखाचा करावा, असंच माझ्या मनानें घेतलं होतं. मी शिक्षित असून

मला येणारीं स्थळें मी आपण होऊन नाकारीत असतां, मी यांच्याशीं विवाह केल्यास त्यांत त्यांचाही गौरवच होईल, माझ्याही मनासारखं होईल; एक ना दोन–हजारों तऱ्हांनीं विचार करूनही मला माझ्यांत बदल होण्याचं चिन्ह दिसेना. मी वडलांजवळ बोललें. पण ते त्यावेळीं विशेष कांहींच बोलले नाहींत. माझं मन टांगून राहिलं. दादांचा नक्की विचार मला कळेना. बरं, विचारण्याची घाईही करतां येईना.

एक, दोन, तीन, ओळीनें पांच सहा दिवस गेले. माझ्या अपेक्षे-प्रमाणें दादांनीं त्यांना विचारायला हवं होतं पण त्यांनीं तसं केलं नाहीं. मी तरी त्यांना पुनः कसं म्हणणार? वडलांच्या या उदासीनतेनें माझ्या मनाची अगदीं विकल अवस्था झाली होती. या पांच सहा दिवसांत कांहींनाकांहीं निमित्त काढून मी माधव-रावांची भेट घेण्याचं टाळलं. पण माझ्या या टाळाटाळीनें त्यांचीही भेटीची उत्कंठा तीव्र झाली असावी. कारण एकदां मी घरांतून बाहेर पडायला व ते दारावरून जायला एकच गांठ पडली. आम्ही एकमेकांच्या दृष्टींतून सुटणं ही गोष्ट अशक्य होती. त्यांनींच शेवटीं अधीरतेनें म्हटलं,

‘ सिंधूताई, काम आहे, जरा वेळ असला तुम्हांला तर ! ’

मी जिभेनें वेळ नाहीं म्हणायचं शंभरदां मनांत आणलं, पण ‘ हो ’ असा शब्द केव्हां निघून गेला, तें मला कळलं सुद्धां नाहीं. ते आले, बसले. कामाचं नुसतं निमित्त होतं. माझ्या अंतःकरणाचा ठाव घ्यायलाच ते आले होते. कारण एक मिनिटांत भाषण संप-वून अधीरतेनें ते कांहींतरी विचारणार होते, हें स्पष्ट दिसत होतं.

आम्ही बोलत होतों. पण माझं गुपित घरांत कळलं असल्यानें मला चोरटेपणा वाटत होता. कळलं तर कळलं, त्याचं आतां काय, मग पहातां येईल, असा विचार मनांत आला. तरीही मन

अतिशय गोंधळलं होतं. कां कोण जाणें, मला न कळतां माझे डोळे पाण्यानें डबडबले.

'हें काय! तुम्हांला बरं नाहीं वाटत आज?' त्यांनीं विचारलें.

असे प्रश्न कोण कोणाला विचारीत नाहीं? पण मला अगदीं जवळच्या माणसानें तो प्रश्न विचारसाल्यासारखं वाटलं. इतका जिव्हाळा आईच्या व दादांच्याहि प्रश्नांत असणार नाहीं, असं त्यावेळीं मला वाटलं. न कळत धक्का लागून रुईचं बोंड एकदम फुटतं व त्यांतून कापूस वाऱ्यावर भराभर फेंकला जातो; त्याप्रमाणें त्यांच्या या सहज प्रश्नानें हृदयाचा बंधारा फुटून आंतील विचार खळबळून बाहेर पडण्याचा प्रयत्न करूं लागले. मी त्यांच्याशीं किती तरी बोललें. मुद्याचे शब्द तोंडून आले नाहींत तरी माझ्या मनाला आलेल्या औदासिन्याचें वर्णन मी इतकं कांहीं न कळत करीत गेलें, कीं माझी मलाच मागाहून त्याची लाज वाटूं लागली. त्या औदासिन्याचं वर्णन मी आईशीं नाहीं, बहिणींशीं नाहीं, मैत्रिणींशीं नाहीं, कोणाशींही करूं शकलें नसतें. तें वर्णन इतर कोणालाही रुचलं नसतं व पटलं नसतं; उलट तें अगदीं क्षुल्लक व हास्यास्पद वाटलं असतं आणि इतरांना सांगण्यानें माझ्या मनाचंही समाधान झालं नसतं आपला मनस्ताप वाटेल त्याला सांगून कसा कमी होईल? त्याला योग्य तेंच माणूस पाहिजे. तसं वर्णन मी त्यांच्याशींच करूं शकलें. बोलत असतांना प्रत्येक वेळीं 'असं कांहीं औदासिन्य मला विना-कारण आलं आहे' हें ध्रुवपद माझं सतत चालू होतें. अर्थात 'विनाकारण' हा शब्द विनाकारणच होता. कळणाराला त्याचा उपयोग मी कां करीत होतें तें कळलंही असतं व त्याप्रमाणें त्यांना तें कळतही होतं. माझ्या भारावलेल्या हृदयाला मी हलकं करीत असतां, ते भिस्किलपणें हंसून समोरच्या चित्राकडे पाहूं लागले.

मीही जरा कृत्रिम रागानेंच म्हटलं, "हंसतां काय?

तुम्हांला कल्पना यायची नाहीं." माझ्या या वाक्यानें ते अधिकच हंसले.

"मी मुळीं बोलायला नकाच होतं. हें असं माझं नेहमीं चुकतं" असं म्हणून मी गप्प झालें. पण एकच क्षण. त्यांचाही चेहरा इतका कांहीं पालटला, कीं तेव्हांच्या त्यांच्या नेत्रांतील मार्दव मी कधींही विसरणार नाहीं.

'सिंधू, मी तुझी चेष्टा का करतों आहें? मलाही उदासीनतेची अगदीं अशीच तीव्रता भासते. कां कोण जाणें!"

आम्ही दोघेंही यावर हंसलों, पण क्षणांत गंभीर झालों. शब्दांनीं न सांगतांही जें कळायचं तें परस्परांस कळलं. मनं अगदीं हळुवार झालीं. काय गंमत आहे पहा! आइबापांच्या आज्ञेंत वागणारी मी या वेळीं किती पुढें गेलें होतें. स्पष्टवक्तेपणानें आईबापांशीं चर्चा करणाऱ्या माझ्यांत क्षणार्धांत केवढा फरक झाला. विश्वासाचें स्थान पालटलंसं वाटलं. आईबापांच्याजवळ साऱ्या दिवसांतील घडलेल्या गोष्टी खुल्या दिलानें मी बोलत असें. आतां त्यांच्याजवळ बोलण्याचा मला विसर पडला. कारण विश्वासाचं स्थान निराळं झालं. खरोखर लहानपणापासून आईबापांबद्दल असणाऱ्या ममत्वाचा कबजा तिसरंच मनुष्य कसं, व किती थोड्या वेळांत घेतं! आणि न कळत आपण तो कबजा किती घेऊन देत असतों! या गोष्टींची परस्परांना कल्पनाही नसते इतकी ती एक बेभान धुंद वृत्ति असते. सबंध दिवस जगावर वावरून दिनराजालाही सायंकाळीं वसुधादेवीच्या प्रेमसागरांत बुडून तिच्या अथांग हृदयाचा ठाव घ्यावासा वाटतो. असल्या बुडीनंतरच तो दुसऱ्या दिवशींच्या कार्यक्रमाला सुरवात करूं शकतो. सबंध दिवस कोठेंही असो, संध्याकाळीं माझ्या हृदयाचा ठाव घ्यायला आल्याशिवाय त्यांना चैन पडेना. माझीही तीच अवस्था झाली होती. आमचे घरीं संध्याकाळीं

आम्हीं भेटत असूं. तास दोन तास केव्हांच जात. मध्यंतरींचा वीस बावीस तासांचा वियोग आमच्या हृदयांना किती जडता आणीत असे ! संध्याकाळच्या आमच्या भेटीनें येणारी प्रफुल्लता व प्राप्त होणारें नवचैतन्य अनुभवल्यावर हें आमच्या ध्यानांत येई. माझ्या विश्वासाचं स्थान पालटलं. पण त्याबरोबर मनाची चोरी वाढली. आईला दादांना न सांगतां मी वचनबद्ध झालें होतें. एकदां वाटे, ही माझी चूक तर नव्हे ? पण पुन्हां मन आंतून बंड करून सांगे "तुझी मुळींच चूक नाहीं. दादांनीं तुला लहानपणापासून ज्या पद्धतीनें वाढविलं व जो स्पष्टपणें बोलण्याचा मार्ग घालून दिला त्याला त्यांनींच हरताळ फांसला आहे. तेव्हां तुझी चूक कांहीं नाहीं." पण लगेच दुसरं मन असं म्हणे, कीं "तुला तरी संवय नको का ? तूं दादांजवळ बोलल्याला असे कांहीं सहा महिने नाहीं झाले ! सारे पंधरा दिवस झाले."

अशा या रणधुमाळींत पहिलें मन विजयी होई व म्हणे 'हा संयमाचा पाठ म्हाताऱ्यांच्याच उपयोगी ! विकारांच्या तुफानापुढें संयमाच्या भिंतीची कशी दाणादाण उडते, हें तारुण्यांत प्रत्येकाला माहीत असतं." मी ज्या विश्वासानें आणि सरळपणानें दादांजवळ बोललें तितक्याच विश्वासानें आणि सरळपणें ते मजजवळ कां बोलले नाहींत ? उन्हाच्या तिरपीनें लोणी वितळायचंच. आम्हां उभयतांच्या मनांत उत्पन्न झालेल्या भावना सान्निध्यानें शब्दस्वरूपीं उतरल्यास तो गुन्हा होईल काय ? संयमी लोक, तसेच, आमच्या मनाकडे कठोरपणानें अगर औदासिन्यानें पहाणारे लोक मला गुन्हेगार म्हणतील. त्यांच्यापुढें मीं किती जरी पोथी वाचली तरी त्यांना पटायची नाहीं. माझ्या मनांत भावनांचे अंकुर फुटतांच दादांनीं नकाराचा वणवा त्यांना लावला असता तरी हरकत नव्हती. पण 'होय' नाहीं, व 'नाहीं' नाहीं, अशा उपेक्षेंत

अशा भावनांचे अंकुर किती फोंफावले, याची कल्पना माझ्याशिवाय इतरांना कशी येणार ? मला त्यांना भेटण्याची दादांनीं बंदी केली. त्याबरोबरच मी त्यांच्याशीं बोलत बसतें, हें त्यांना आवडतही नव्हतें. पण त्यांनीं आपली नावड स्पष्ट शब्दांत दाखवीपर्यंत मन पळवाट काढीत होतं. एकदां अंकुरित झालेल्या व रुजलेल्या मनोभावना दादांचा स्पष्ट नकार मिळेपर्यंत मला त्यांच्याकडेच ओढून नेत होत्या. उगीच बुजून जाऊं नको असंही आश्वासून सांगत होत्या. आतां हीही गोष्ट खरी, कीं मुळांतच दादांनीं स्पष्ट नकार दिला असता, तरीही माझं घांवरं मन कितपत आवरलं असतं, याची मला शंकाच आहे. दादांना माझं मन दुखविण्याचं जिवावर आलं असावं म्हणूनच त्यांनीं ' नाहीं ' म्हणण्याचं टाळलं. त्यांचा रुकार असता तर या गोष्टी त्यांनीं झटपट केल्या असत्या हें उघड आहे.

दादांच्या उपेक्षेच्या काळांत अवघ्या पंधरा दिवसांत माझ्या भावनांनीं माझ्या हृदयांत मूर्ति पुरी कोरली सुद्धां. प्रारंभींच मनोभावनांचे साहित्यावर निखारा ठेवला असता, तर माझ्या हृदयांतील सिंहासन कोरंच राहिलं असतं कदाचित्. पण आतां तर मूर्ति पुरी होऊन सिंहासनावर आरूढ झाली सुद्धां. रोज शब्दकुसुमांनीं व दृष्टींतील प्रेमजलांनीं तिचं साभिषेक पूजनही सुरू केलं. आतां तिचा विध्वंस करणं अगर विध्वंस झालेला पहाणं मला तरी शक्य नव्हतं, या पंधरा दिवसांत क्षणोक्षणीं माझ्यांत जितका बदल झाला तितका पूर्वीं कधींच झाला नसेल. माझ्या आयुष्यांतील तुफान विचारांचा, तुफान भावनांचा व चिंतनाचा कळस त्या पंधरा दिवसांत झाला. माझ्या आयुष्यांतील तो अत्यंत महत्वाचा संधिकाल. त्यानंतर अमावास्येची रात्र येणार कीं पौर्णिमेच्या शीतल आल्हाददायक चांदण्यानें मी न्हाणार हें मला माहीत नव्हतं, तें कळून घेण्याच्या वृत्तींतही मी नव्हतें.

माझ्यांतील इतका विलक्षण फरक दादांना पूर्णपणें कळणं शक्य नव्हतं. पण कांहीं थोडा फरक त्यांच्या लक्षांत आल्यावांचून राहिला नाहीं. माझं त्यांच्याशीं बोलत बसणं त्यांना आवडेना. त्यांनीं आपली नावड हजार तऱ्हांनीं मला दाखविली. पण मला आतां माघार घेणं शक्य नव्हतं. आम्ही केवळ वचनानेंच बद्ध होतों. मर्यादांचा अतिक्रम केला नव्हता. पण त्या अवस्थेंत दोन माणसं इतकीं दृढतेनें बद्ध होतात, कीं त्यांना तें बंधन तुटलं म्हणजे मरणच ठाकलं असं वाटत असतं. वचनबद्धतेचा संधिकालच अत्यंत मनोहर असतो. त्यांत बफाम धुंदी असते व इतर सर्व गोष्टींचा अगदीं विसर पडलेला असतो. आपल्या हृदयांतील सिंहासनस्थ मूर्तींच्या एकाग्र चिंतनांत वृत्ति मग्न होतात. दोघांशिवाय तिसऱ्याला जगांत ठावच नसतो.

मला दादांनीं नकार दर्शवितांच मी त्यांना स्पष्ट सांगितलें कीं, "आम्हीं वचनबद्ध झालों आहों." हें ऐकून दादा उद्विग्न झाले. गरिबाला मीं पतकरलं हें त्यांना आवडलं नाहीं. गरिबीचीं दुःखं अनुभवलीं असल्यानें; त्यांना मी गरिबीचा स्वीकार करावा, हें पसंत असणं शक्य नव्हतं. 'मला त्यांच्या गरिबींतून मार्ग काढण्यांतच आनद वाटतो,' असं मी म्हणतांच त्यांनीं मला स्पष्ट सांगितलं कीं, "सिंधू, आतां या चार घटका तुम्हांला मनोहर वाटतील, पण दारिद्र्यानें करपून जाल तेव्हां प्रेम बीम कांहीं शिल्लक रहाणार नाहीं."

त्या वेळच्या मनःस्थितींत मला दादांचे अनुभवसिद्ध बोलही पटणं शक्य नव्हतं, पण त्यांच्या बिनतोड विचारावर उच्चारायला शब्दही मजजवळ नव्हते, त्यामुळें तर आतां विलक्षण चोरटेपणा आला. एकीकडे मन व एकीकडे हृदय यांची ओढाताण होऊं लागली. दादांच्या स्पष्ट नापसंतीनें आमचं घरीं बोलणं वर्ज झालं. पण माझं मलाच आश्चर्य

वाटतं कीं वडलांची अवज्ञा, फसवणूक हे शब्द माझ्या विचारमालिकेंतून पार तुटून गेले होते. मी त्यांच्या घरीं त्यांना भेटत असें. माझ्या वडलांची नापसंती दिसतांच, तेही आमच्या घरीं येईनासे झाले. अर्थात् माझ्याबद्दलची त्यांची ओढ यत्किंचितही कमी झाली नव्हती उलट दोघांवर आकाश कोसळलं आहे, आतां एकमेकांना एकमेकांचाच काय तो आसरा, अशी श्रद्धा वाटूं लागली. कोणाच्याही विरोधाला न जुमानतां विवाह करण्याचं आम्ही नक्की ठरविलं. पण इतक्यांत रान न उठवतां, आपले बेत आपल्याशींच ठेवून दोन तीन वर्षांनीं सर्व बाजूंनीं स्थिरस्थावर झालं, म्हणजे लग्न करायचं असा आमचा बेत ठरला. आमच्या पुढील आयुष्याबद्दल आम्हीं दररोज बोलत असूं. मला ते व त्यांना मी. जणूं बाकी जग आम्हांला पारखं आहे, अशा समजुतींत आशा, चिंता, उत्कंठा इत्यादि गोड भावनांचा अनुभव आम्ही घेत होतों.

आमच्या विरुद्ध घरचं वातावरण होतं. तें बदलण्यासाठीं त्यांनीं आपली पात्रता हरतऱ्हेनें सिद्ध करून दाखविली पाहिजे होती. मी त्यांना म्हणे " तुमची कीर्ति तीच माझी. तुमच्या कीर्तीत विलीन व्हायलाच मला आवडेल. यासाठीं गरिबीसुद्धां चालेल; पण तेजस्वी जीवन मला हवं आहे. जन्माला आल्यावर माणसासारखं जगून, नांव कमवून जगांतून जावं, ही माझी उत्कट इच्छा मी त्यांच्याजवळ नेहमीं बोलून दाखवीं. माझे विचार, माझं बोलणं त्यांना मुळींच नापसंत नव्हतं. एवढंच नव्हे; मी यासाठींच त्यांना आवडत असावी, असं मला वाटतं. पण या विवाहपूर्व संधिकालांत एकमेक एकमेकांना कां आवडतात, याचं मनाशीं स्पष्ट विवरण झालेलं नसतं व तसं झालं असलं तरी तें परस्परांना सांगण्याच्या भानगडींत पडण्याइतकं त्याचं महत्व वाटत नाहीं, असं म्हणा हवं तर. त्यावेळीं दोषही आवडतात. गुणही आवडतात. दोष हे सुद्धां गुणच वाटत असतात. दोष हे कुसळा-

प्रमाणें व गुण तेवढे मुसळाएवढे वाटत असतात. आवड काय ती दृष्टीची ! आवडत्या माणसाच्या चेहेऱ्यावरील सूक्ष्म फरकानेंही त्याच्या मनाचा ठाव घेण्याचें ज्ञान जर केव्हां न शिकवितांही येत असेल, तर तें याच काळांत. एकमेकांबद्दलच्या भावनांचीं मुळं जितकीं अधिक खोल गेलेलीं, तितकं हें मनकवडेपणाचं ज्ञान अधिक येतं.

मला आठवतं आहे, निःशब्दपणें एकमेकांकडे पहाण्यांतही आमचा किती तरी वेळ निघून जात असे. त्या मुकेपणांत हजारों, नव्हे, लाखों शब्दांचें सामर्थ्य एकवटलेलें असे. भेटायच्या पूर्वी पुष्कळ बोलायचं आहे असं वाटे. भेटतांच क्षणभरांतच बोलणं पुरं होई. पण अशा निःशब्द भेटींतील आनंद खरोखर अनुपम होता. अशा स्थितींत सहा महिने, वर्ष निघून गेलें. माझ्या वडलांचा माझ्यावरील रोष कमी झालेला नव्हता; कारण ते बोलले नाहींत तरी तुटकपणा दाखवीत असत. प्रथम मी वडलांशीं बेपर्वाईनेंच वागलें. एवढंच नव्हे, तर आमच्यामधील आकर्षण जसजसं वाढलं तसतशी ही बेपर्वाई अधिक वाढली होती आणि वडलांच्या विरोधानें आमच्या आकर्षणाची तीव्रता अधिकच भासूं लागली.

व्यवहाराच्या कठोरतेनें कवीच्या प्रतिभेला धार येते, तशीच व्यवहारांतील अमानुष कठोरतेनें कधीं कधीं त्याची प्रतिभा जळून खाकही होते. माझ्या भावनांची अशीच स्थिति होती. चंद्रावरील कलंकाचें भूषण मानून चंद्राचं पूर्ण सौंदर्य चाखण्यासाठीं सागराला भरती आली, तरी पौर्णिमा गेल्यावर पुढें अमावास्या व भरतीच्या ऐवजीं ओहोटी लवकरच येते. वडलांच्या विरोधानें आमच्यांतील आकर्षण वाढलें व आकर्षणांतून वडलांबद्दल बेपर्वाई वाढली. तरी ज्या घरांत ही बेपर्वाई मी दाखवी, तेथील व्यवहाराच्या अनेकविध कठोरतेनें मला बोचून घेतलं व विचार करावयाला लावलं. माझ्या मनांत द्वंद्व सुरू झालं. आज वर्षभर ज्यांचे दोष मला गुणासमान वाटत

होते, ते आतां दोष या स्वरूपांत दिसूं लागले. त्यांना माझी ओढ लागल्यामुळें गेल्या वर्षभर मला एक प्रकारें मोठा अभिमान वाटे. पण माझ्या ओढीपुढें ते कर्तव्य विसरतात, असं वाटल्याबरोबर मला त्यांच्यांत कर्तव्यापेक्षां विकारवशता अधिक वाटूं लागली. माझा विसर पडून त्यांना कर्तव्याची जाणीव तीव्र व्हावी, म्हणून मी तुटकपणानें वागूं लागतांच ते कर्तव्याला पुरतेच पारखे बनूं लागले. एकाद्या टेकडीची चढण चढून जाऊन पाय घसरावा, अशा वेळीं चढायला वेळ लागेल, त्याच्या दशांशही वेळ पायथ्याशीं यायला लागत नाहीं. तसाच कांहींसा प्रकार त्यांचा होऊं लागला. आत्यंतिक आपुलकीच्या भावनेमुळें, माझा तुटकपणा व तुसडेपणा त्यांना फारच बोंचूं लागला. त्याबद्दलचा विचार करण्यांत व माझी मर्जी प्रसन्न करण्याचा प्रयत्न करण्यांतच त्यांचा वेळ जाऊं लागला. त्यामुळें मला जें हवं होतं, तेवढंच केवळ त्यांच्या हातून होईनासं झालं. कृत्रिम तुटकपणाला खरं स्वरूप येऊं लागलं. "ज्याला रत्न म्हणून हातीं धरलं, ती कांचच म्हणायची मग ? असंच कर्तव्यहीन जीवन जो मनुष्य कंठूं इच्छितो, त्याच्याबरोबर आयुष्य घालवणं माझ्यासारखीला किती भयंकर वाटेल !" असे विचार माझ्या मनांत येऊं लागले. वडलांनीं त्यांच्यांत दोष दाखविले, ते तर मला आतां मोठ्या प्रमाणांत दिसलेच, पण त्याहूनही बारीक सारीक दोष मोठें स्वरूप घेऊन मला भिववूं लागले. त्यांचं मजवरील आत्यंतिक प्रेम मला विषासारखं कडू वाटूं लागलं. माझ्या संसाराचं मी उभं केलेलं चित्र कोठल्या कोठें विरून चाललेलं दिसूं लागलं. एकूण अन्नपूर्ति आणि प्रजानिर्मिती एवढं माझ्या संसारांतील माझं ध्येय व्हायचं तर ? संसारांत तेंच व्हायचं; पण या दोन्ही गोष्टी जर पतीच्या कर्तव्याच्या व ध्येयाच्या कोंदणांत बसणार नसल्या, तर मला तो

तसला संचारच नको. लगेच दुसरं मन असेंही म्हणे, कीं प्रथम ज्या मनोवृत्तीमुळें तुझं मन या माणसाकडे आकर्षिलं गेलं, त्या उच्च मनोवृत्ति या माणसांत सुप्त आहेतच. प्रेमाच्या उडालेल्या तात्कालिक राळींत त्या दिसत नाहींत एवढंच. पण लगेच वाटे. छे! ही कांहीं राळ नव्हे. उलट प्रेम हें सौम्य व आल्हाददायक तर खरंच, पण तसंच तें धगधगीत इंधन आहे. त्यांतूनच मनुष्याचे गुण तावून सुलाखून धडपडून बाहेर येतात. तसं जर येथें होत नाहीं, तर तुझी निवडच चुकली व याचे पुरावे त्यांच्याशीं बोलतांना मला अनेक वेळां दिसत. माझ्या ध्येयवादाची चेष्टा तर ते करीतच, पण त्यांतही पुरुषी अधिकार गाजविण्याची अरेरावी असे. मी दुसऱ्या कोणा पुरुषाशीं कांहीं कारणानें कमीअधिक बोलत बसलें, तरी त्याबद्दल ते मला दूषणें देत. त्यावेळीं ते म्हणत, " तुझा मला संशय येत नाहीं पण सर्वच माणसं सारखीं नसतात. आणखी असं, कीं इतर लोकांची तुमच्याकडे पहाण्याची दृष्टि निराळी असल्यामुळें तुम्हीं त्यांच्या निंदेला आणि कुत्सित टीकेला कारण होण्याची भीति आहे. " मला त्यांचं हें बोलणं पटत नसे. ते माझ्याबद्दल संशय घेतात असंच मला वाटे, व मालकी हक्काची जाणीव त्यांच्या पुरी पुरी आलेली मला दिसे. मला पाहिजे असणाऱ्या गोष्टीकरितां ते कांहीं करीत नसत; त्यामुळें त्यांची अरेरावी मला दुःसह होई. " तुझ्या तुटक वागण्यानें माझ्या कर्तव्यांत व्यत्यय येतो, तिकडे मन लागत नाहीं. " असं ते म्हणत. त्यामुळें मला दुहेरी पेंच वाटे. तुटक न वागावं तरीही ते केवळ माझ्या विचारांत मग्न राहात; तुटक वागावं तरीही तेंच. त्यांचं प्रेम हें दुधारी शस्त्र झालं होतं व तें माझ्यावरच चालत होतें.

माझ्यावर, वाचनांत अगर अन्य व्यवसायांत मी गुंतलें, तर " ज्यांत मला स्थान नाहीं ते व्यवसाय तूं काय म्हणून करणार ? "

अशी त्यांची टीका सुरू होई. बरं त्यांच्याबरोबर हे उद्योग करायचे ठरवावे, तर उद्योग बाजूलाच राहून नुसत्या बोलण्यांत वेळ जाई. हा माझाच मनोदोष कीं काय, तें मला कळेना. पण मला आपलं वाटे, कीं ज्या वेळीं जें करायचं तेंच केलं पाहिजे. जसं दैनंदिनीचं वेळापत्रक करायचं, तसेच मनाचेही निरनिराळे कप्पे पाहिजेत व योग्य वेळींच योग्य तो कप्पा उघडला पाहिजे.

मी जेव्हां कर्तव्य, ध्येय वगैरेबद्दल त्यांच्याशीं बोलें, तेव्हां ते म्हणत, "तुला काय एवढं वाटलं त्याचं? मी मनांत आणलं, तर वाटेल तें करून दाखवीन. आणि तुला वाटलं, तरी खरं पाहिलं, तर त्यांतही समाधान नाहीं, हें पक्कें लक्षांत ठेव. ध्येय, कर्तव्य इत्यादिकांविषयीं उच्च स्वरांत बोलणारीं व आपल्याला त्याप्रमाणें बांधून घेणारीं माणसं आयुष्याच्या अंतापर्यंत असमाधानीच असलेलीं कितीदां तरी दिसून येतात, आणि तुझ्या महत्वाकांक्षा म्हणजे काय? असं विचारलं तर तुला तरी त्या कळल्या आहेत का? लिहिणं, वाचणं हीच महत्त्वाकांक्षा असली तर त्यांत अवडंबर माजवण्याइतकं मला कांहीं वाटत नाहीं."

त्या वेळच्या माझ्या मनःस्थितींत त्यांचं हें बोलणं मला पोकळ आत्मविश्वासाचं, ऐदी जीवनाचं. कर्तव्यजागरूकांची हेटाळणी करणारं असं वाटलं. जीवन सुखाकरतां आहे ना? मग तुम्हांला निष्कर्तव्य जीवनांत सुख; मला ध्येयात्मक असमाधानी जीवनांत सुख. दोघांच्या अशा भिन्न मनोवृत्ति उघड दिसत आहेत. त्या एकत्र आणून दोघांच्याही सुखाची होळी करण्यापेक्षां दोघांनीं आजच एकमेकांचा कायमचा निरोप घेणं बरं." असं मी त्यांना म्हटलं, पण प्रेमाचे चिवट धागे अशानें थोडेच तुटणार होते? ज्या आत्मविश्वसानें मी वडलांच्या विरोधाला न जुमानतां विवाह

करण्याचं ठरवलं होतं, तो आत्मविश्वास व स्वाभिमान मला माझी चूक कबूल करूं देईना. घटकेंत ऊन व घटकेंत पाऊस असा आमच्या प्रेमाचा प्रकार सुरू राहिला. मात्र पावसाळ्यापेक्षां उन्हाळाच तीव्र होऊं लागला. आपसांतील अनेक मुद्यांवरील विरोधानें मन भावनाशून्य बनूं लागलं. शेवटीं असा काळ आला, कीं या व्यक्तीची आपण माया कधीं धरली होती काय? आणि धरली असली तरी कां व कशी धरली? याबद्दल स्वतःचंच मन प्रश्न विचारूं लागलं.

आयुष्यांत एकदां मनोभावानें आत्यंतिक प्रेम दुसऱ्या व्यक्तीला अर्पण केल्यावर, त्या आत्यंतिक प्रेमानें व त्याला मिळालेल्या मोबदल्यानें शरीरांतील अणु अणु पुष्पित होतात, चेतनामय होतात. अशी कांहीं विलक्षण शक्ति, अशी कांहीं विलक्षण जादू निर्माण होतें, असा कांहीं पूर्वी कधींही न अनुभवलेला गूढ आनंद मनाला होतो, कीं जगांत ज्यासाठीं असंख्य जीव तळमळत असतात, जें लाभावं म्हणून कवींची व रसिकांची अहोरात्र धडपड चाललेली आपण पहातों, तें सुखाचं प्रफुल्ल पुष्प जणुं आपल्याला एकट्यालाच या जगांत लाभलं आहे, असं आपल्याला वाटूं लागतं. तें खरोखर हातीं आलं असलं तर गोष्ट निराळी; पण कधीं असंही घडतं, कीं आपल्या विशिष्ट आकांक्षांना कोंदणांत बसवील, असं हृदय आपण शोधीत रहातों. एकाद्या व्यक्तीच्या ठिकाणीं तें सांपडलं, असं वाटतं, मग माया आपले पाश पसरूं लागते. पण दुर्दैवानें शेवटीं असं आढळतं, कीं ज्यासाठीं आपण त्या विशिष्ट व्यक्तीची माया धरली, तो दिव्यत्वाचा केवळ आभास होता, क्षणांत फुटणारा सुंदर फुगा होता. मग मात्र भडक रंगाला भुलून लहान मुलानें धगधगीत निखारा हातीं घ्यावा, तशी स्थिति होते. प्रेमाची भरती ओसरूं लागून वाळवंटांत तडफडणाऱ्या माशाप्रमाणें स्थिति होते. मग भरती ओहोटीची अंतःकरणांत इतकी दहशत बसते, कीं

आपला आपल्यावरचा विश्वास उडतो. हें प्रेम विष तर ठरणार नाहीं ना? असा आपला आपल्याला हजार वेळां प्रश्न पडल्याशिवाय राहात नाहीं.

---